माझ्या ' पाथेय ' या कथासंग्रहाप्रमाणे 'यौवन' ची दुसरी आवृत्ति मजवर लोभ करणाऱ्या रसिकांच्या कृपेने आणि श्री. धुमाळ यांच्या प्रयत्नाने प्रकाशित होत आहे ' यौवन ' ची प्रथमावृत्ति औंधच्या ' उषा ' प्रकाशन तर्फे श्री. वसंतराव सातवळेकर यांनी काढली होती.

मराठी रसिकांनी असाच लोभ ठेवावा येवढेंच त्यांचेकडे माझें मागणें.

धरमपेठ एक्स्टेंशन,
नागपूर १६-२-५४

वामन चोरघडे

# अनुक्रमणिका

# यौवन

गंधवती : क्षमावती
धरित्री

त्वं च धारय मां देवी पवित्रं कुरुचासनम् ॥

# यौवन

टीप– " मनोहर " मासिकाच्या सप्टेंबर १९६१ च्या अंकात श्री. मंगरूळकर यांनी चोरघड्यांवर एक परिचय-लेख लिहिल्याची गोष्ट ताजीच आहे. तो लेख अनेक दृष्टींनी महत्त्वाचा आहे. हें चोरघड्यांचे लघुकथांचे तिसरे पुस्तक! अशा प्रसंगी त्याच्यासंबंधी माहितीपूर्ण असे कांहीतरी असावे, असे मला वाटत होते. ' मनोहर ' मध्ये हा लेख पाहिल्यावर त्याची मूळ प्रत मागवून ती मी चोरघड्यांकडून तपासून घेतली.

सर्व मजकूर त्यांनी जसाच्या तसाच ठेवला. फक्त माहिती-संबंधी ज्या चुका होत्या, तेवढ्या सुधारल्या, हें त्यांच्या वतीने मी येथे नमूद करीत आहे. हा परिचय-लेख उद्धृत करूं दिल्या-बद्दल श्री. मंगरूळकर यांचा मी आभारी आहे.

तसेच, मला असेंही वाटले की, आरंभीचे अगदी पहिले शब्दचित्र जर आपण दिले, तर वाचकांना चोरघड्यांच्या लेखनाचा विकास कसा झाला, हें कळेल. सबब त्यांची क्रमाने पहिले व दुसरें अशी दोन शब्दचित्रेंहि सोबत छापली आहेत. वाचकांना हा उपक्रम आवडेल, असे वाटते.

प्रसन्न श्री. सातळेकर

## श्री. वामन कृष्ण चोरघडे,

एम्. ए., बी. टी.

सुमारे पांच वर्षांपूर्वी जी गोष्ट घडली, ती मला तरी मोठी सूचक वाटली. त्या वेळीं नागपूरच्या ' लोकांच्या शाळेंत ' एक मोठा नवलपूर्ण प्रकार घडला. सुप्रसिद्ध कादंबरीकार श्री० ना० ह० आपटे हे वक्ते होते आणि त्यांच्या ग्रंथांइतकीहि ज्यांच्या वयाची बेरीज व्हायची नाही, असे चोरघडे हे अध्यक्ष होते. कुणाला या वैचित्र्याचे काहीहि वाटो, पण आपट्यांना मात्र खात्रीने आनंद झाला होता. याचे प्रत्यंतर दुसऱ्याच दिवशीं आले. 'सिटी कॉलेज' मध्ये सायंकाळीं आपट्यांचे जें भाषण झालें, त्यांत त्यांनी नागपूरच्या कथालेखकांना चोरघड्यांच्या गोष्टी लक्षपूर्वक वाचण्याची शिफारस केली.

अर्थात् वरील दोन्ही प्रसंग चोरघड्यांबद्दल उत्कंठा वाढवावयाला पुरेसे होते. तथापि त्या वेळीं त्यांच्याशीं ओळख होण्याचा योगायोग मात्र आला नाही. कसें जायचें, हा प्रश्न पहिला व कसे बोलावयाचे हा प्रश्न दुसरा ! उगीचच आपण

चोरघड्यांबद्दल गैरसमज त्या वेळी करून घेतला याचें आता मला वाईट वाटते.

तथापि माझ्या उत्सुकतेची तार आणखी ताणावयाची होती व ती ताणविणाराहि प्रसंग लागलीच दुसऱ्या वर्षी घडला, तो असा. आमच्या मॉरिस कॉलेजची मधली सुट्टी झाली होती. विद्यार्थी पोर्चमध्ये रेंगाळत होते. इतक्यांत एका उंच व पांढरे कपडे घालून सायकलवर जाण्याऱ्या व्यक्तीकडे पाहून दोन विद्यार्थी ओरडले—' अरे, तो पहा चोरघडे. त्यानंच लग्न केलं रजिष्टर व ते कुणाशीं ठाऊक आहे ? आपल्यापेक्षा वयाने वडील अशा एका डॉक्टरणीशी. '

तेव्हा असे हे चोरघडे ! " श्री० वामन चोरघडे, नागपूर " ! आता कधीकधी चोरघडे म्हणतात की, " त्या प्रसंगाच्या वेळी मला लोकांनी जी बोटे दाखविलीं, त्यांत इतका उन्माद होता कीं, त्या वेळचा लग्नाला झालेला सगळा विरोध मी सहन करूं शकलों. " त्यांच्या लग्नाचा वर्तमानपत्रात खूप गाजावाजा झाला होता. आकाशांत ढग नसतांना एखाद्याने वीज पडलेली पहावी, तसे हे झाले होतें. चोरघड्यांच्या सख्या दोस्तांनासुद्धा या लग्नाबद्दल वर्तमानपत्रानेच बातमी दिली होती.

या प्रकारांत मला वाटतें, चोरघड्यांच्या स्वभावविशेषांचा नीट कस लागतो. त्यांचें सगळ्या माणसांशी वर्तन कधीच सारखें नसतें. थोडा स्पष्टपणा आणि परिस्थितीने अंगीं बाणलेला

अभिमान या गोष्टी सोडल्या, तर त्यांचे भिन्नभिन्न व्यक्तींशी अगदी भिन्न भिन्न वर्तन असतें व मग माझ्यासारख्या त्यांचा मित्र म्हणविणाऱ्या माणसालाही खरे चोरघडे कोणते, याचा उलगडा होत नाही. चोरघड्यांनी गरिबीमुळे हायस्कुलांतली तीन वर्षे आणि कॉलजांतली चार वर्षे हाताने स्वयंपाक करून घालविलीं; पण यापैकी एकाहि गोष्टीचा त्यांच्या मित्रांना फारसा सुगावा नव्हता. किंबहुना मित्राशीं वागणारे चोरघडे आणि आपल्या गरिबीशी झगडणारे चोरघडे या दोन अगदी भिन्न गोष्टी होत्या. श्री. ग. त्र्यं. माडखोलकरांसारख्या स्वभावाची चिरफाड करणाऱ्या खंद्या टीकाकारांबरोबर रात्रीरात्रीं भटकणारे चोरघडे; श्री. पु. भा. भाव्यांबरोबर रात्रीं दोनदोन वाजतां तेलंखेडीच्या ' चमन परीन् ' बुरुजावर जाऊन भावनावश होणारे चोरघडे आणि आपल्या श्री. दोडके आदि मित्रांबरोबर सतत राहणारे चोरघडे— या तीन व्यक्ति अगदी परस्पर विरुद्ध अशा भासत होत्या. आता तर त्यांच्या जीवनाचे कितीतरी विविध असे पैलू पडले आहेत. शाळेच्या जगांत वागणारे, श्री. कालेलकरांसारख्या जीवनाचार्यांच्या सान्निध्यांत समाधान व कृतकृत्यता मानणारे आणि वर्धेच्या गांधीमय वातावरणांत मिसळूं पाहणारे चोरघडे अजून मला ओळखायला आले नाहीत व त्याचे पडसाद त्यांच्या वाङ्मयांतही फारसे अजून उठले नाहीत.

परंतु एका विशिष्ट दृष्टीने पाहिले, तर खरे चोरघडे ओळखण्याचें एक साधन त्यांच्या स्वभावांत खास आहे. ते म्हणजे त्यांचे ध्येयवादित्व आणि निष्ठा. मी जेव्हा चोरघड्यांच्या खोलीत प्रथम गेलों, तेव्हा मला काय दिसले ? टेबलाच्या वरच्या बाजूस गांधींचा फोटो. दारावर भगतसिंग व दत्ताची त्या वेळीं गाजलेली तसबीर, एक कॅलेंडर, दोरीवर वाळत घातलेलें खादीचे पांढरे कपडे, खाली अंथरलेल्या शिंदीच्या तीन आणे प्रत्येकीं किंमतीच्या चटया आणि तीन पांजऱ्याच्या पेट्या. त्या पेट्यांमागून कायसें डोकावत होते. जरा लवून बघितले, तेव्हा दिसलें, एक तबला. चोरघड्यांचे बंधु त्यांच्याबरोबर रहात होते. दोघांनाहि तबल्याचा व गाण्याचा शोक. गाण्याच्या मैफली परीक्षेच्या आदल्या दिवशीहि रात्ररात्र ऐकत बसण्याचा हव्यास ! पण आता त्यांना तबल्याची आपली हौस टेबलावर टक् टक करीत भागवावी लागते; कारण त्यांच्या उजव्या आंगठ्याला कांडे ( Witlow ) झालें होतें व तें बोट खूप मोठें झालेले ! त्यांच्या मित्रांत त्यांचा हा आंगठा Editorial thumb म्हणून प्रसिद्ध आहे; कारण ‘ चेतना ’ हस्तलिखिताचे ते तीन वर्षे एकटाकी संपादक होते !

होय, मी ध्येयवादित्वाबद्दल व निष्ठेबद्दल बोलत होतों. ते खादीचे कपडे आज सरासरी एक तप झालें चोरघड्यांच्या अंगावर आहेत. त्यांच्या मित्रांनी कित्येकदा गांधी व खादीशी

लगट केली, तथापि त्यांत कालमहिमाच अधिक; पण वामनरावांनी जें एकदा गांधींच्या नांवानें कुंकू लावलें, तें अजूनही व गांधींच्या विचारसरणीची ओळख करून घेण्याचीहि त्यांची जिज्ञासाही पुष्कळ; तथापि त्यांच्या मित्रांना मात्र त्यांची खादी किंवा गांधी कधीच त्रासदायक झाले नाहीत. श्री. पु. भा. भावे शिवीशिवाय कधी गांधींचें नांव उच्चारीत नाहीत, पण चोरघड्यांचे अगदी जवळचे मित्र आहेत. श्री. दोडके हे जवळजवळ बोहेमियन ( मऊ अर्थानें ), पण तरी वामनरावांची त्यांची अकृत्रिम अशी अगदी नागपुरी दोस्ती आहे. त्यांच्या दोघांच्या बोलण्यांतले अस्सल नागपुरी प्रयोग हे तर संभाषणाचें मोठेंच वैशिष्ट्य होय !

त्यांच्या निष्ठेप्रमाणेच त्यांचें ध्येयवादित्व त्यांच्या लग्नाच्या वेळीं प्रत्ययास आलें. त्यांचे लग्न दोन्ही पक्षांकडील कुणालाच पसंत नव्हतें; पण त्यांनी हा विवाह संपूर्णपणे स्वतःला पटला म्हणूनच केला. ' ताईनें माझा सगळा संसार सुखाचा केला, तिच्यामुळे मला सर्व प्रकारचें सुख लाभलें,' असे कृतकृत्य होऊन चोरघडे जेव्हा उद्गार काढतात, तेव्हा मोठें नवल वाटतें. त्यांच्या लग्नाच्या वर्षीच ( १९३६ ) त्यांचा ' सुषमा ' नांवाचा पहिला कथासंग्रह प्रसिद्ध झाला होता. त्यांतील मुलींच्या व स्त्रियांच्या भूमिका कांही विशिष्ठ व्यक्तींवरूनच रंगविल्या आहेत, असें कितीतरी लोक म्हणत होते. 'कुसुम,' 'माई' कांचे-

ची किमया' मधील 'ज्यूलिया' कधीतरी लेखकाच्या आयुष्यांत येऊन गेल्या आणि त्यांच्या प्राप्तीची आशा नसल्यामुळे हळहळून हे सगळें लेखन केलें, असा कित्येक टीकाकारांनीहि आरोप केला होता; पण या सगळया प्रकरणाला त्यांच्या लग्नाने फार वेगळे असें महत्त्व आलें व पुष्कळांचे पुष्कळ गैरसमज नाहीसे झाले !

'ताई' अगदी साध्या आहेत. सर्वच बाबतींत साध्या आहेत व चोरघडे कमालीचे सुखवादी आहेत; पण इतकें असून चोरघड्यांना ताईच्या ठिकाणीं जो विसावा लाभला, त्याचे कारण त्यांच्या मानसकन्यकांचे गुणसर्वस्व व वृत्तिवैशिष्ट्य त्याना 'ताईंत' सापडलें व या ताईंनी त्यांचा आयुष्याचा दृष्टिकोणही पुष्कळसा बदलून दिला. त्यांच्या गोष्टीत निव्वळ प्रणयाला स्थान कधीच नव्हतें. तें कां नव्हतें, हें मी पुढे सांगणारच आहें. तथापि त्यांच्या विवाहपूर्व गोष्टी आणि विवाहानंतरच्या गोष्टी जर बारकाईने पाहिल्या, तर त्यांत त्यांचा दृष्टिकोण सहज दिसून येईल. चोरघड्यांचा मूळचा स्वभाव कमालीचा हळवा व गरीब. आपल्या डोळयांवर कुणीतरी 'फुंकर घालावी;' हळूच हात फिरवून आपल्याला कुणीतरी झोपवावें, कानाशीं गोड कुजबुज करावी, झोप येत नसल्यास कुणीतरी आपल्याला गोष्ट सांगण्याचा आग्रह करावा,— हा सगळा मूळ स्वभाव आपल्याला त्यांच्या गोष्टींतून दिसून येतो. त्यांचें पहिलें पुस्तक त्यांनी 'झाडांच्या सावल्यास' अर्पण केलें आहे.

## वामन चोरघडे

' झोपेंत लिहिलेली गोष्ट ', ' कांचेची किमया ' ' अंतरंग ' या गोष्टींनी अनेक रसिकांना जें वेड लावले होते, याचे खरें कारण चोरघड्यांनी त्या गोष्टी अगदी समरसतेने आपल्या जीवनांतले आंतले आंतले पापुद्रे उकलून लिहिल्या होत्या.

आणि लग्नानंतर ' ताई ' च्या सहवासांत असलेल्या वामनरावांनी ' हवन ' प्रसिद्ध केले व " चराचराणां जठरेषु तिष्ठते, त्रिधा विभक्ताय नमोऽस्तु वह्नये " असा संकल्प केला. कुठे 'झाडांच्या सावल्या' व कुठे हे 'हवन'. हा सगळा फरक त्यांच्यांत ताईच्या सहवासाने झाला.

म्हणूनच मला कधीकधी वाटतें की, चोरघड्यांना ज्या आरंभींच्या ' भेदक ललकारी ' सारख्या गोष्टींनी लोकप्रियता मिळवून दिली, त्या लघुकथांचें आता त्यांना महत्त्व वाटतें कीं काय, हें पाहणें उचित होईल. त्यांच्या ' सुषमे ' तील वातावरण म्हणजे मनाचा ' भावविवश आत्मसंभोग ' असे एका टीकाकाराचें मत आहे. आजच्या पुरोगामी वाङ्मयाच्या कसोटीने त्यांच्या तसल्या गोष्टी परिणामकारक असल्या, तरी कमी मोलाच्या ठरण्याचा संभव आहे. एखाद्या रूपसुंदर ललनेने प्रियकराच्या कबरीसमोर बसून अश्रुसिंचन करावें व सकाळी जोराने वाहणाऱ्या पूर्वेकडच्या वाऱ्याला म्हणावें— ' हे वाऱ्या ! तूं हळू वहा; कारण तुझ्या झोताने गुलाबकलिका एकमेकींना स्पर्श करतात. त्यांचा चट्‌चट् असा आवाज होतो व त्याने माझ्या

प्रियकराची झोप मोडते !' सुषमेंतील कांही कथांचें वातावरण वरील प्रसंगासारखे काव्यमय आहे. त्यांत काव्य, भाषा, भावनाविलास आहे; पण तें सगळें भरदार वाटत नाही, असा त्यांच्या कित्येक टीकाकारांचा त्यांच्यावर आरोप आहे.

याच्या अगदी उलट प्रकार लग्नानंतर त्यांच्या हातून ज्या गोष्टी लिहिल्या गेल्या, त्यात दृष्टीस पडतो. विवाहाने त्यांच्या शैलीत आणि विषयांत कितीतरी फरक घडवून आणला आहे. स्त्रीपुरुषांच्या गोष्टी या वेळीहि त्यांनी लिहिल्या; पण त्यांत विवाहपश्चात् आयुष्याचेच चित्रण त्यांनी केलें. ' विवाहाने लघुकथेचा शेवट व्हायला नको, तर सुरुवात व्हायला हवी. वरणभात व मुलें यांचा प्रश्न विवाहानंतरच उद्भवतो व समाजाचाहि साकल्याने परिचय त्याच वेळीं होतो. प्रेमाची सुधा चाखून पोट भरत नसतें— ' असे ते बरेचदा म्हणत असतात. ' अबोध बोध, ' ' चार आघात ' ' घार ' 'परवाचीं दोन स्वप्नें,' ' त्या व त्यांची दुःखें ' या गोष्टी प्रामुख्याने त्यांच्या मताची साक्ष देतील. त्यांचें सगळयांत प्रेम जर कुणावर असेल तर मनुष्यस्वभावावर ! तो वाईट असेल, तरीदेखील ते कठोर शासन करीत करीत त्याचें समर्थन करीत असतात. चूक झालेल्या माणसाला ' दुष्टा, नष्टा, पापिष्टा, काय केलेंस हें ! ' असें ते कधीहि आपल्या कथांतून खेकसत नाहीत, उलट सगळे अपराध एका विशिष्ट जीवित-बंधनांनी जखडल्यामुळे होतात,

अशी त्यांची खात्री असल्यामुळे अपराध व अपराधी यांचे यथातथ्य चित्रण त्यांच्या हातून घडते.

वामनरावांचें बरेच — सगळेंच जवळ जवळ — लिखाण अनुभूतीचें व म्हणून जिवाला भिडणारें आहे. ते पददलित वर्गाचे चित्रण मार्मिकतेने व आपुलकीने करतात, याचें कारण झाले तरी तेच असूं शकेल. नरखेड हे त्यांचें जन्मगाव. तेथे आरंभाचा काळ गेलेला. गोंडांच्या, मराठ्यांच्या घरी ते लहानपणीं रहात, जेवीत, झोपत. दिवसभराच्या कष्टाने ज्यांचीं अंगे भिजून चिकट झालीं आहेत, मातीने व घामाने केसांना कैदाशिणीचे कार्कश्य प्राप्त झाले आहे, अशा गोंडागोवाऱ्याच्या म्हाताऱ्या बायका ' बापूला ' माडीवर घेऊन भरवीत, तेव्हा कसलाही परकेपणा बापूला तेथे जाणवत नसे. त्यांनी लहानपणीं जेवूं घातलें, त्या अन्नाचे उपकार बापू विसरला नाही व मिठाची याद ठेऊन त्याने ' मातीच्या भांड्यांतून ' 'तलाया' चें पाणी नेले आणि त्या लोकांची चित्रे रंगविली. ' रात्रिरेवं व्यरंसीत् ' सारख्या गोष्टी किंवा ' विहीर ' सारखी छोटी कहाणीही त्याचें नांव मराठी वाङ्मयांत कायम टिकविण्यास समर्थ आहे, याचें कारण चोरघड्यांनी लहानपणीं तीं सुखदुःखे अनुभविलीं आहेत.

खेड्यांत मिळालेल्या या अनुभवाला भर घालायला त्यांनी रात्रीं रात्री भटकायची सवय स्वतःला लावून घेतली. नागपुरांतले सगळे लोक व सर्व प्रकारचे अनुभव त्यांनी घेतले. त्यांत

त्यांनी जातीने भाग घेतला नसेल; पण सगळें पाहून तर खचित घेतलें ! सायंकाळीं साडेपांचला व्यायाम करून अभ्यासाला बसावें, अठनऊच्या सुमारास बाहेर पडावे. भटक भटक भटकावें आणि शेवटीं पहाटें चारच्या सुमारास आमच्या नागपूरच्या शुक्रवारा तलावाच्या बुरुजावर बसून अंतर्मुख व्हावें. नागपूरचे ग. त्र्यं. माडखोलकर किंवा पु. भा. भावे यांच्याबरोबर रात्रीं रात्रीं भटकतांना तर त्यांना आमच्यापैकी कित्येकांनी पाहिलेंच आहे, तथापि ' संत्रामार्केटच्या सफरी, ' ' साथमे साथ नाचगाना ' असलेले एक आणा तिकिटाचे इरसाल नागपुरी वस्तीतील खेळ पहाण्याचें धाडस हे त्यांचें एकट्याचेंच. खेळ पाहण्यापेक्षा तेथील लोकच पाहण्यांत त्यांनी आपल्या तिकिटाचा उपयोग केलेला आहे. नागपूरच्या सोळा सर्कल-मधलि मारपीट, बेइज्जती, उन्मत्तपणा, दारुड्यांच्या कामचेष्टा याही गोष्टींना चोरघडे प्रेक्षक म्हणून हजर राहिलेले आहेत. वेश्यांच्या जीवनांवर मात्र चोरघड्यांनी एक ओळही लिहिली नाही. 'आपल्याला त्यांच्यावर लिहिण्याचा अधिकार प्राप्त होण्या-इतकें त्यांचें जीवन आपण पाहिलें नाही व पत्नीशी व आई-बापाशी प्रामाणिक रहावयाचें झालें, तर तें या जन्मीं पाहणेंही शक्य नाही, ' असें ते म्हणत असतात. तो प्रांत तसा त्यांनी अगदी सोडूनच दिला आहे.

आमच्या नागपूरचा 'शुक्रवार' तलाव अनेक दृष्टींनी महत्त्वाचा

आहे. प्रो. फडके, माडखोलकरांपासून तो चोरघड्यांपर्यंत सर्वांना त्याने कोणत्या ना कोणत्यातरी कारणाने आकर्षित केले आहे. तिथले वातावरण मोठे संगूढ असे असते. चंद्राचा प्रकाश सर्वत्र पसरलेला, समोरच्या पारशांच्या चाळीतून चंदनाचा सुगंध वातावरणांत दरवळलेला. सगळे शांत. रात्रीं साडे अकराची वेळ व अशा वेळीं दिवसा फारसे न दिसणारे उत्कृष्ट वेगवान् टांगे खाड् खाड् आवाज करीत सरळ मॉडेल मिलकडून 'सक्करदऱ्याकडे' चाललेले. टांग्यांना भोवताली पडदे असत. तेथे काहीतरी कारस्थान आहे, ही पक्की जाणीव ठेवून चोरघडे कित्येकदा रात्रीं " सक्करदऱ्या " कडे भटकले आहेत. फक्त जीव धोक्यांत येणार नाही, इतकें पाहून ते पुढे धजत व तित-पत जे दिसेल ते पहात. पुष्कळशीं विदारक दृष्यें पाहून त्यांना उबग येई व ते परत फिरत. ' भोसल्याचे स्मशान ' हेदेखील मोठें रम्य असें ठिकाण आहे. ' वास्तुदेवता ' ' नाग ' असल्या गोष्टी त्यांना तिथेच सुचल्या असतील.

कधीकधी तळ्याच्या पलीकडे स्टेशनरोडवरील संत्रा मार्केट-मध्ये जावे, संत्र्यांचा सोन्यासारखा पिवळा भला मोठा ढिगारा पहात उभे रहावे व त्यांच्या आड चाललेला प्रकार दृष्टीस पडून परत फिरावे व येतांना नीति-अनीति या शब्दाचा अर्थ लावत बसावा. असे कितीतरी वैचित्र्यपूर्ण अनुभव त्यांच्या कथांतून दिसतात. आपल्या कथा आपल्याला कोणकोणत्या

प्रसंगावरून सुचल्या, हें जर त्यांनी लिहून प्रकाशित केलें, तर तें त्यांचें लिखाण एखाद्या कादंबरीसारखें रोचक होईल.

असला हा खेड्यांपाड्यांतून मिळविलेला अनुभव त्यांनी नुसताच गोष्टींतून विखुरला नाही. 'लघुकथा' हेंच त्यानी आपल्या वाङ्मयसेवेचे माध्यम ठरविलें असलें, तरी लोकगीतांची त्यांना फार हौस आहे. त्यांचे ' साहित्याचे मूलधन ' हें पुस्तक केवळ लोकसाहित्याची चर्चा करणारेंच नसून काव्यमयही आहे व त्यांतून त्यांनी ग्रामगीतांचा ग्रामीण जीवनाच्या अनुषंगाने करून दिलेला परिचय हृद्य आहे. त्यांचे हे पुस्तक तज्ज्ञांना व रसिकांना फार आवडले असून, मराठीतील तसले हे पहिलेच पुस्तक आहे.

ते हल्ली वर्धा येथे राहतात. वर्धा आता जवळजवळ एक केंद्र झालें आहे. या ना त्या निमित्ताने व विशेषतः गांधींसाठी हजारो प्रकारची माणसें तेथे सतत येत असतात. सगळ्या प्रकारचे राजकीय प्रवाह तेथे पहायला मिळतात. हिंदीचा व गुजरातीचा तर तेथे पळापळावर संबंध येतो. चोरघडे दोन्ही भाषा जाणतात. हिंदीत त्यांनी लिहिलें आहे. 'हंस' मासिकांतून त्यांच्या कांही गोष्टींचीं त्यांनी स्वतः केलेलीं भाषांतरें प्रकाशित झालेलीं आहेत. शिवाय 'कालेलकरांवर' त्यांनी जें मूळ हिंदींत शब्दचित्र लिहिलें, तें देखील सरस आहे. हिंदींत सरस्वती-प्रेसने सुरू केलेली ' गल्प-संसार-माला ' सर्व भाषांतील कथांचे संग्रह

प्रकाशित करीत असते. त्यांतील मराठी विभागांचे संपादन चोरघड्यांनी केलें असून, त्या पुस्तकाला ' मराठी लघुकथेचा विकास ' म्हणून एक परिचयलेख त्यांनी लिहिला आहे. त्यावरून चोरघड्यांची एरव्ही मंजुळ पदन्यास करणारी लेखणी प्रसंगी कशी तिखट होऊं शकते, याची सहज कल्पना येते.

त्यांच्या गोष्टींतील कोणतीही ओळ घ्या. त्यांत भाषेसंबंधी फार काळजी घेतलेली आपल्याला दिसेल. सुरुवातीला चोरघड्यांनी आठ आठ वेळा आपल्या गोष्टी नीट कराव्या नि पुनःपुनः लिहाव्यात. त्यांना आपल्या गोष्टीच्या सजावटीसाठी श्रम करतांना कधी थकवा आला नाही. पक्षी आपलें घरटे बांधतांना कितीतरी भटकतात व आपलें घरटे पिसांनी दाबून दाबून मऊ करतात. संस्कृताच्या अध्ययनाचा त्यांच्या भाषालालित्यावर इष्ट असा परिणाम झाला आहे. द्राक्षरसाने उन्मत्त झालेल्या नर्तकीने अंगप्रत्यंगांतून आपले भाव प्रकट करावेत, त्याप्रमाणे शब्दाशब्दांतून ते आपली मनीषा व्यक्त करतात. तरुणीच्या सौंदर्याला ज्या अर्थाने कधीकधी ' लावण्य ' हें विशेषण लावतात, त्याच अर्थाने तेंच विशेषण चोरघड्यांच्या भाषेला लावतां येईल. गोष्टींचीं शीर्षकें अत्यंत वेधक, पुस्तकांचीं नांवें अत्यंत सूचक अशी देतांना ते हीच आपली कलापूर्ण दृष्टि वापरतात. त्यांचा पहिला संग्रह ' सुषमा ' प्रकाशित झाला, तेव्हा इतका चांगला शब्द आपल्याला कळल्याचा कितीतरी जणांना आनंद झाला.

## यौवन

चांगल्या वाङ्मयाचें गमक काय, याविषयी पुष्कळ मतें आहेत. त्यांत एक गमक असे की, ते सगळ्यांना समजायला हवे. वाचकाच्या योग्यतेची तिथे गरज नसावी. या कसोटीला चोरघड्यांचें लिखाण उतरणार नाही. त्याचे वाङ्मय वाचणारा एक विशिष्ट वर्ग आहे. मला कित्येक मंडळी अशी माहीत आहेत की, जी मराठी मासिकांना नांवें ठेवते; पण चोरघड्यांची गोष्ट दिसली की, वाचून मोकळी होते. म्हणूनच 'आपल्या गोष्टी आवडीने वाचणाऱ्यांपैकी मी आहें,' असे श्री. खाडेकर त्यांना लिहितात, ते केवळ चोरघड्यांना बरें वाटावे म्हणून खचित नव्हे. आणि आता तर पुरावा मिळाला आहे. परवाच्या आपल्या सोलापूरच्या अध्यक्षीय भाषणांत खांडेकरांनी चोरघड्यांचा गौरवपूर्ण उल्लेख केला आहे !!

चोरघडे सतत लिहीत नाहीत, याबद्दल त्यांना पुष्कळ लोक दोष देतात. त्यांत बरेच तथ्य आहे. विवाहपूर्व आयुष्यांत त्यांनी ' प्रतिभेत ' त्या मानाने बरें लिहिलें; पण याला तरी कारण माझ्या मते त्यांची ती फिरण्याची सवयच होती. रात्रीं भटक भटक भटकल्यावर एक वेळ अशी येते की, पाय थकतात— शरीर सुन्न होते, बोलायचे सगळे विषय संपतात; पण मन जागे होऊन दृष्टि अंतर्मुख होते. असल्या या Mood मध्ये चोरघड्यांनी जे थोडें लिहिलें, तें गोड लिहिले. आजकाल ही अंतर्मुख, एकाकी लहर लागण्याची संधी त्यांना मिळत नाही.

दिवसाचे सगळे तास त्यांनी कामाला वाटून दिले आहेत. वर्धेच्या 'नवभारत विद्यालयांत' ते शिक्षक आहेत. सगळा दिवस तिथे जातो. श्री. कालेलकरांच्या भाषेत म्हणजे 'जातिवंत शिक्षकाने विश्रांति घेतां कामा नये,' हें जसें कांही चोरघडे प्रत्यक्षच आचरणांत आणीत आहेत. ते माझ्याकडे आले, म्हणजे नेहमी घाईत असतात व म्हणतात— "कालेलकर[1] म्हातारे आहेत, गांधी सत्तरीवर गेले, जमनालालजी[2] तर काय हजार भानगडीचे कडबोळें, पण म्हातारीं म्हातारीं माणसें आमच्या वर्धेला सकाळीं पांचपासून रात्री नऊपर्यंत Nonstop काम करीत असतात, मग माझ्यासारख्याने ऐन पंचविशीत थकलों म्हणून कसें चालेल. आमच्या वर्धेच्या गांधी-सर्कलमध्ये एकच गोष्ट मला महत्त्वाची वाटते व ती म्हणजे श्रम व सतत श्रम!"

तेव्हा सपाटून थकून घरीं आल्यावर ताईच्या सहवासाचा वाटा ताई काढून घेतात. चि० सुषमा (मुलीचें नांव) व चि० श्रीकांत (मुलगा) या भावंडांना आपला बाप अगदीच लेखक आहे, असे तर वाटूं देतां उपयोगी नाही व पुनः लेखन, वाचन — नंतर सगळें पेट्रोल (चोरघड्यांचा आवडता वाक्प्रचार) जाते संपून – मग कसलें भटकणे व कसले अंतर्मुख क्षण! हें सगळें मनांत आले म्हणजे जीवनाच्या सुसूत्रतेबद्दल त्यांना

---

१ श्री. काकासाहेब कालेलकर.

२ श्री. जमनालाल बजाज.

कधीकधी मोठी खंत वटतें व विषादाचे उद्गार त्यांच्या तोंडून निघतात; पण मग त्यांनी ज्या गोष्टींनी मनाला तृप्ति मिळेल, अशा गोष्टीलाही अवसर द्यायला नको काय ? अनियामित जीवनालाही एक वेगळीच गोडी व खुमारी असते व म्हणूनच सगळ्या लेखकांना बरेंचदा बरींचशीं सामाजिक बंधनें जाचतात. चोरघड्यांना नियमितपणाचा पहिल्यापासून मनस्वी कंटाळा. सायन्स विषयाला नियमित अभ्यास लागतो, म्हणून सायन्स सोडून देतील. लायब्ररी पुस्तकें विशिष्ट मुदतीत मागते, म्हणून आपलें कॉलेजांतील जीवन कोटाशिवाय काढून पुस्तकें विकत घेतील; पण बंधन मात्र कशाचेंही लावून घेणार नाहीत. हिंदी मातृभाषा असलेले त्यांचे संस्कृतचे प्रोफेसर त्यांना फार आवडत. त्या प्रोफेसरांनाहि चोरघड्यांनी मराठींत लिहिलेला संस्कृताचा पेपर खूप आवडे; पण लगेच ते म्हणत— " या, बरेच दिवसांनी आपण भेटतों आहोंत. Homework केलें कां ? " अर्थात् Homework तयार नसायचेंच. वहींत एखादी गोष्ट किंवा Zola च्या पुस्तकांतलि टाचणें असावयाचीं—किंवा ' मानव्याच्या दिशा ' बद्दल विचार डोक्यांत चालायचे ! तथापि प्रो० मिराशीसारखे ' वाकाटकांच्या साम्राज्यांत ' दंग असणारे प्रज्ञावंतदेखील ' मानव्याच्या दिशा ' वाचून वर्गात आनंद प्रदर्शित करीत व "you must keep the same excellence in Sanskrit also." असा हळूच

चोरघड्यांना चिमटा घेत.

पण या कॉलेजच्या गमती आता चोरघड्यांना पुनः अनुभवावयाला मिळणे शक्य नाही. त्या त्यांच्या जीवनांत ते भरपूर व अनिर्बंध भटकत आणि म्हणून भरपूर लिहीत. त्यांचें लिखाण आवडीने वाचणारे बरेच वाचक आहेत. माझ्याप्रमाणेच त्यांनाही चोरघड्यांनी खूप लिहावें, असें वाटतें आणि म्हणूनच मला या सगळ्यांच्या वतीने चोरघड्यांना जाहीर रीतीने येथे एक प्रश्न करावासा वाटतो -- व म्हणावेंसें वाटतें-

' चोरघडे ! मग करणार ना आता भटकायला सुरवात ? "

नागपूर — मधुकर श्रीधर मंगरूळकर
ता० २०-४-४१ बी. ए., एल्एल्. बी.

# अम्मा *

हुः ! हु. !! हुः !!! कोण थंडी ही ! पण अशाही थंडींत आमची आई उठत असे. उठल्याबरोबर तिचे आपले म्हणणं सुरू होई—

" ऊठ पुरुषोत्तमा वाट पाहे रमा. "

हे तिचें पालुपद सुरू झाले की, आम्ही ' पुरुषोत्तम ' नसलो आणि आमची वाट पहावयास ' रमा ' नसली, तरी आम्हांला मात्र उठावें लागे. रडतराऊ आम्ही ! सकाळीं उठून तिच्या-सारखें स्नान थोडेंच करावयाला बसलों ? चांगले बेशरमासारखे उठावें आणि शेजारच्या गणोबाच्या शेकोटीवर जाऊन बसावें. आमचेही कांही सवंगडी होतेच ! आम्ही आलो की, बिचारे आमच्याकरिता वडील माणसांच्या आज्ञा (?) भिरकाऊन येथे यावयाचे आणि आमचा अड्डा चांगला भास्करबुवा येईपर्यंत चालावयाचा. गोष्टीचे विषयही अगदी ' राऊंड टेबल ' सारखे आणि राऊंड बसूनच ! हा आमचा चातुर्मासाचा कार्यक्रम !

---

* अगदी पहिले शब्दचित्र.

## यौवन

अशीच एक पहाट होती. आज मला पहाटेच्या प्रहरांत एक विचित्र स्वप्न पडल्यामुळे माझी झोप लवकरच उघडली. मी उठलों आणि दारांत येऊन बसलों. अंगावर आईची शाल घ्यावयास मात्र विसरलों नव्हतों.

रस्त्याने या वेळेस फारसें कोणीच जात नव्हतें. पहाटे साडेचारला एक गाडी येत असल्यामुळे कांही कष्टाळू टांगेवाले नुकतेच स्टेशनच्या रस्त्याला लागले होते. स्वतःजवळ असलेल्या दुपट्यानें स्वतःचें सर्व अंग झाकून व एखाद्या गाठोड्याप्रमाणे बसून ते घोड्याला हांकीत होते. त्यांच्या तोंडांतली बिडीची टोकें मधून मधून ओढतांना चमकत. आज मला त्य रस्त्याने तेंच फक्त दिसत असल्यामुळे आणि रिकाम्या वेळीं कशाकडेही पाह-ण्याची मनुष्याला सवय असल्यामुळे मी आज त्यांच्याकडे जास्त लक्ष्य लावून पहात होतों. समोरचा टांगेवाला मागच्या टांगे-वाल्याशीं घोड्याकडे लक्ष्य न देतां थंडबद्दल बोलत होता. इतक्यात त्याचा घोडा अडला व त्याने समोर पाहिलें. तो एकदम म्हणाला—

" ए बाई, जरा दूर हो जा. इतनी ठण्डीमें कहाँ जाती माई ? "

माझें लक्ष्य अगदी समोरच होतें. त्याने संबोधिलेली बाई मला चटकन् दिसली. ती बाजूला झाली व टांगे भर्र्र् निघून गेले.

ती बाई माझ्या घरासमोरूनच जात होती. ती जवळ येतांच मी तिला ओळखलें. तिचें नांव अम्मा होतें. ती आमच्या घरीं वरेचदा येत असे. आई आजारी असली किंवा घरीं कांहीं जास्त काम असलें की, ती आमच्याकडे येई व वरकाम करी. तिचा उदरनिर्वाह कसा चालला होता, हें मला अजूनही माहीत नाहीं; पण मला ती नेहमी काम करतांनाच दिसे. धाकट्या इंदूला कधीकधी ती खाऊवगैरे आणीत असे. यावरून तिला पोटापेक्षा जास्त मिळत होतें, येवढें मात्र खास

आजही ती रिकामी चालली नव्हती. तिच्या डोक्यावर पाण्याची घागर होती व ती पूर्ण भरली असल्यामुळे चालतांना पाण्याचे थेंब तिच्या कपाळावरून खाली उतरून तिच्या नेसत्या लुगड्यावर पडत. यामुळे तिचें लुगडे ओलें होत होतें. तिला बिचारीला थंडी वाजत नसेल का ? असा विचार माझ्या मनांत आला. इतक्यांत ती माझ्याजवळ आली व पुढे जाऊं लागली. मी तिला विचारलें—

" अम्मा, इतक्या थंडीत कशाला पाणी भरतेस ? तुला थंडी वाजत नाही ? " मला थंडी वाजत होती, म्हणून हा मी तिला प्रश्न केला. तिनें माझ्याकडे पाहिलें आणि हसून ती म्हणाली " बेटा, थंडीतर वाजायचीच. ये ठंडीकेही दिन है, फिर वह क्यों नहीं सतायेगी ? अपना काम करना बस । "

शेवटचें वाक्य अम्मानें जातां जातांच उच्चारलें. ती माझ्या-

गमोहून गेली; पण तिच्याबद्दलचे विचार माझ्या मनांतून कांही केल्या जाईनात. मला माझ्या आळशीपणाची लाज वाटूं लागली आणि त्या दिवशी मी त्या ' अड्डयावर ' गेलों नाही. एवढ्या थंडींतही अम्मा आपले काम – तिला ते कर्तव्य वाटत असेल का ?–करते अं ?

\+ + +

उन्हाळा, हिवाळा व पावसाळा या तिन्ही ऋतूंत अम्मा सृष्टीची पर्वा न करतां आपलें काम करी. जिकडेतिकडे उन्हानें हाहाःकार करून सोडावा आणि अशा वेळीं दुपारीं अम्मानें डोक्यावर पिठाचे टोपले घेऊन दुसऱ्याचे दळण अनवाणी पोचवावें. आठआठ दिवस पावसानें झोड करून सोडावी. पक्ष्यांना घरट्यांतून बाहेर निघण्यास अशक्य व्हावें, पण अम्मा मात्र आपलें काम करीत असे. थंडी, ऊन्ह, पाऊस यांवर जणु तिनें मात केली होती. आमची आई तिला इतके कष्ट न करता घरीं येऊन राहण्यास सांगे; पण कोणाचे घरीं असें खाणें तिला पसंत नसे. ती आपलें काम नित्य करी व त्यांत बाध आणणाऱ्या वस्तूंना फाजील महत्त्व ती देत नसे. आपलें काम करणें यालाच ती कर्तव्य समजत असे आणि तें ती अविरत करीत असे.

\+ + +

आज मी बऱ्याच पहाटें उठलो होतों–नव्हे, मला उठवि-

ण्यांत आलें होतें. उठल्याबरोबर मी स्नान केले आणि आम्ही सर्व शेजारच्या पाताळेश्वराला जाऊन आलों. आज शिवरात्र होती. त्या दिवशी मी आपले सर्व तत्त्वज्ञान एका ठिकाणीं केलें व त्याची एकदा उजळणी केली; पण भुकेमुळे माझा जीव कांहीं स्वस्थ राहीना; कितीही फराळ केला, तरी त्याला भोजनाची सर थोडीच येणार आहे? मी एकादशी केली आणि दिवसभर चरलों; पण अंतरीचा तळीराम कांही गार होईना. खोटें कशास सांगूं? संयमनाचा असा एखादा प्रसंग आला की, तेथे माझें तत्त्व-ज्ञान हटकून लंगडें पडे.

त्या दिवशी दुपारीं बाराची गोष्ट असेल. मी, आई, इंदू, घरांत शेंगदाणे निवडीत होतों. इंदू फार लबाड. ती आपले शेंगदाणे निवडी, पण आईचें लक्ष्य जरा इकडेतिकडे गेलें की, तिच्या हातचे दाणे ताटांत पडण्याऐवजी तिच्या पोटांत पडत असत. मला असें करतांच येत नव्हतें; कारण मी मोठा. पोटांत कितीही काहूर माजलें, तरीपण मी मोठा पडलों ना? मग तसें कसे करावे? त्या वेळीं मला असे वाटे की—

लहानपण अम्हां द्यावें देवाजीनें।
इंदूसारखे दाणे। खायासाठी ॥ १ ॥

पण मीच कधी देवाची पूजा केली नाहीं, तर देव मला प्रसन्न होईल कसा?

आमचें काम चाललेंच होतें. त्या वेळीं मी मोठेंच संयमन केलें. अंगावर मोठेपणाचें दडपण होतें, तरी येवढें संयमन करणें कांही लहानसहान गोष्ट नाही !

मार्जे निवडून संपल्यावर मी जाऊं लागलों. तितक्यांत अम्मा आमच्या घरीं आली. आज आईला ' जागोबाला ' जावयाचें असल्यामुळे घरकाम करावयास तिने अम्माला बोलाविलें होतें. ती येतांच मी तिला विचारलें—

" अम्मा, आज तुला उपवास नाही ? "

अम्मा नेहमीप्रमाणे या वेळेसही हसली. मी उत्तराच्या अपेक्षेने तिच्याकडे पाहूं लागलों. ती म्हणाली—

" कशाचा उपवास भैय्या. जिस दिन खानेको नहीं मिला, उस दिन उपासही है । आज कशाचा उपास ? "

या तिच्या उत्तराने मी अगदी गार झालों. स्वतःचें तत्त्वज्ञान अम्माने आपल्या वर्तनाच्या परिसावर घासून उजळ केलें होतें. तिचें तत्त्वज्ञान कितीही क्षुल्लक असो, पण माणसाला क्षणभर स्तंभित करण्याची जादू त्यांत खास भरली होती. आमच्या अशा उपवासापेक्षा तिचा ठणठणीत उपवास—तो कोणत्याही दिवशीचा कां असेना—परमेश्वराच्या दरबारीं जास्त पुण्याईचा ठरत असेल नाही ? मी तेथून उठलों व माझ्या मनाला एकदम समाधान वाटलें.

पुढे संयमन—कर्तव्य या लढ्यांत माझें मन बराच वेळ घोटाळत होते, पण येवढें मात्र खरें की, त्या दिवसापासून मी गणोबाची शेकोटी सोडली.

टिचभर किंवा थोडें मोठें असलें तरी वराक अशा पोटासाठीच अम्मा थंडी, वारे, पाऊस सहन करीत होती का?

ता० १।८।१९३२
सायंकाळी ६ वाजतां

# सव्वा पांच आणे

आज रविवार आहे. मी फिरावयास बाहेर पडलों आहे. मला नेहमी सभोवार पाहण्याची सवय आहे. मी सर्वांकडे अगदी कुतुहलतेने पहात समोर जात आहे. मला अचानक कधीकधी एखाद्या माणसाशीं टक्कर घ्यावी लागत आहे. तरी पण मी समोर चाललों आहे.

मी येथे उभा आहे. माझ्या आजूबाजूला आता फारसे कोणी दिसत नाही. समोरच्या तलावांत* अक्काळविक्काळ आकृति दिसत असून, तें पाणी आता काळसर दिसत आहे; कारण आता सायंकाळ होत आली आहे.

मी तेथेच एका दगडावर बसलों आहें. माझी सवय मला स्वस्थ बसूं देत नाही. मी आजूबाजूला नजर फिरवीत आहे. मला माझ्यापासून सरासरी अकरा यार्डावर कांहींसें दिसत आहे. मी जास्त चौकसपणाने एवढाले डोळे करून त्याकडे पहात आहे.

तो तेथेच स्वस्थ बसला होता. त्याला दगडावर बसण्याची आवश्यकता वाटत नाही. त्याच्याजवळ एक भलें मोठें टोपलें होतें आणि तो त्यांतच बसला होता.

---

दुसरें शब्दचित्र.

* नागपूरचा ‘ शुक्रवार ’ तलाव.

# सव्वा पांच आणे

त्याच्या अंगांत काळ्या रेघांचा, जाड आणि कोटवजा असा एक सदरा होता. त्याने एक फडके डोक्यास गुण्डाळले होते आणि तेवढ्याच आणखी एका फडक्याने त्याची लज्जा रक्षण केली होती. त्याच्या पायांत कांहीच नव्हतें.

तो वर्णाने निमगोरा होता. त्याचे केस अस्ताव्यस्त वाढले होते. तो ते वारंवार खाजवीत होता. दिवसभर आलेल्या घामाने ते चिकट झाले होते. त्याचा चेहरा काळवंडून गेला होता.

तो एक साधारण प्रतीचा, मजबूत आणि वयस्क असा हमाल होता. त्याने दिवसभर काम केले होतें आणि थकवा घालवावा, म्हणून तो सहज बसला होता. त्याला तेथील झाडां-ची, निळ्या आकाशाची आणि काळसर पाण्याची किंमत वाटत नव्हती. त्याला विश्रांति हवी होती आणि स्वतःच्या भल्या मोठ्या टोपल्यांत बसून ती त्याला मिळत होती.

आता त्याचे डोळे लागत होते. तो अशा करकरीत तिन्ही सांजेला निजूं पहात होता. मी त्याला हाक मारली. त्याने अगदी उत्कंठेने डोळे उघडून माझ्याकडे पाहिलें ! कांहीं ओझे न्या-वयासच सांगणार होतों ? मी त्याला कांहींच सांगणार नव्हतो. उलट त्याच्याकडूनच मला माहिती काढावयाची होती.

इतक्या थकलेल्या जिवाला पुन्हा हमाली करण्याची ताकद येते अं ! ती कोठून येते ? ती सहज येते का ? अथवा आणावी

लागते ? त्याचें उत्तर सोपे आहे. ते मी देत नाही.

त्याला तीन मुले होतीं. त्याचा परिवार सर्व मिळून पंधरा माणसांचा होता. सर्वांच्या तोंडांत घास घालण्याची जबाबदारी तीन मुले आणि तो यांच्यावर होती. त्यांच्या बायकाही मधून-मधून रोजमुरा करीत. पण त्याने कांही फारशी तोंडमिळवणी होत नव्हती.

मुले हमाली करीत होतीं. पंचविशी उलटून गेली, तरी बापाची आज्ञा शिरसावंद्य करावयास त्यांची तयारी होती. तीं बिचारीं जिवापाड मेहनत करून कांही पैसे घरी आणीत, त्यांतून पंधरा माणसांचें त्या दिवशींचें अन्न निघे. दुसरा दिवस रामाचा! त्यांचा नाही!

हमाल बसला होता. त्याला आज सव्वा पांच आणे मिळाले होते. ते त्याने हातींच धरिले होते. जणू काय ते त्याच्याजवळ अर्ध्या तासाहून अधिक वेळ रहात नाहीत, याची त्याला स्पष्ट जाणीव होती.

त्याचें वय आज अठ्ठेचाळीस वर्षांचे आहे. त्याने जगांत अठेचाळीस वर्षे श्रम केले. पंधरा माणसांना ओलेकोरडें खाऊं घातले. देशाची संतती उपाशी मरूं दिली नाही. अठ्ठेचाळीस वर्षे! इतक्या वर्षाअखेर त्याला काय मिळालें? सव्वा पांच आणे!

आजचा दिवस त्याचा होता. आज त्याच्याजवळ सव्वा पांच

आणे होते. उद्याचा दिवस रामाचा, त्याचा नाही !

त्याला कधीकाळीं एखादी इच्छा होत असेल, त्याच्या हयातीत म्हणजे गेल्या अठ्ठेचाळीस वर्षात जगाने काय कमाविले, हे पाहावेसे त्याला वाटत असेल, किंवा थकलेल्या जिवास विश्रांति म्हणून कांहीतरी सुखद असें त्याला हवे असेल; पण ते त्याला घेतां येणार नाही; पाहतां येणार नाही. त्याचेजवळ पैसे नाहीत. त्याच्या घरीं माणसे कितीं ? पंधरा ! आणि पैसे ? सव्वा पाच आणेच फक्त !

स्वतःच्या मुलाकरिता कांही करून ठेवावें आणि त्याच्या मुखांत भर टाकावी, असें त्याला वाटत असेल; पण ते होईल कसें ? सव्वा पांच आण्यांत तो करील तरी काय ?

किंवा त्याची अशीही मनीषा असेल की, आपणांला एखादे वेळी चांगलें गोडधोड मिळावे; पण तेहीं बिचाऱ्याला शक्य नाही. आजपर्यंत त्याला तें शक्य झाले नाही. पुढे होईल का ? पण आजचाच दिवस त्याचा ! उद्या रामाचा ! त्याचा नाही !

आईचें दूध तुटल्यावर तो आज सत्तेचाळीस वर्षापासून भाकरच खात आलेला होता आणि आजहि त्याने भाकरच खाल्ली होती. आजचे सव्वा पांच आणेसुद्धा जेव्हा कधी त्याला मिळत नव्हते; तो दिवस त्याला भाकरीविना काढावा लागे. अशा दिवशीं होणारा तोच त्याच्या अन्नांतील बदल ! दुसरा नाही !

तो गरीब होता ! दरिद्री होता ! आणि आज त्याला अठरा-

विश्वें दारिद्र्य दिसत होतें! अठ्ठेचाळीस वर्षे जगांत घालविल्यावर मिळालें काय ? तर फक्त सव्वा पांच आणे !

× × ×

तो तेथून उठून जाऊं लागला. मी त्याला एक चवली देऊं लागलों; पण ती घेणें त्याचें ब्रीद नव्हतें. कष्ट न करितां फुकट असा एकही छदाम या अठ्ठेचाळीस वर्षांत त्यानें घेतला नव्हता. त्याच्या हातीं सव्वा पांच आणे होते आणि ते त्याच्या घामानें भिजून गेले होते.

तो तसाच उठून चालता झाला.

मी आता परत फिरलों असून, विचार करीत घरीं जात आहे.

जगांत काय आहे ? जगाची करमणूक कशानें होते ? पैशाच्या आवाजानें ! गरिबाचें जग आहे काय ? नाही ! गरिबांना जग काय देतें ? फक्त सव्वा पांच आणे !

१८-९-१९३२
सायंकाळीं ७ वाजतां

# वर्षा

जमीन तापली आहे. भेगांभेगांतून वाफा निघताहेत. टेकड्या उष्णतेने सणसणत आहेत.

कधी ढग जमतील? कधी गर्जेल? कधी ओला सुगंध मिळेल?

आकाश काळें झालें. पाण्याचे पर्वत आकाशांत भरले. काळे भोर. ढगांच्या सावल्या जमिनीवर पडल्या. सुग्रास अन्नाच्या सुगंधाने अर्धी तृप्ति होते. धरित्रीस धिवसा आला.

आणि मोठ्याने गर्जलें — मोठ्याने पडलें!!

वर्षा! आकाशांतल्या तारा सांडल्या. रत्नाचे रांजण उपडे झाले. धरित्रीची तृषा निमाली!

वर्षा! सगळा भूभाग जलमय! वृक्ष धुतले गेले. पर्वतांनी आंघोळ केली. सगळें शुद्ध, शुचिर्भूत— अखंड परिमल!

वर्षा! जमीन सडकली गेली. यौवनाचा उन्माद! त्याला सीमा नसते. त्याला घर नसतो. वेग. शक्ति!

आता हा भूप्रदेश जलमय झालेला आहे. रस्ता घसरंडीचा आहे. जपून पावलें टाकलीं नाहीत तर तोल जाईल– पाय घसरेल!

शेतकरी चिखलाने भरलेल्या जमिनींत जपून, मोजकीं पावलें टाकीत बी पेरतो आणि वर्षाकाठीं सोन्याची रास भरून घेतो.

आणि आता ही वर्षा सुरू झाली आहे!

वर्धा ४–१–४१

— १ —

# " कडू जा....गोऽड ये "

आता खरोखरच चटके बसायला लागले. हें पहा माझं रक्त कसं सर सर ओढून राहयलं आहे. किती दिवस दम निघतो देव जाणे !

काय म्हणतां ? अजून माझं वय झालं नाही ? मग मी कुठं म्हणतों ? पण आता माझ्यांत कांही त्राण राहिला आहे का ? ज्या गोष्टी मोठ्या हौसेनं हातीं घेतल्या, त्यादेखील पुऱ्या झाल्या नाहींत. जीं कामं उचललीं, त्यांचाही भार सहन झाला नाही. आता का आणि कसल्या चाळवण्या दाखवूं ? अरे, यारे कुणीतरी ! हीं कामं संभाळा. आता किती अंत पाहतां !

डॉक्टरांनी सांगितलं—नव्हे, परमेश्वरानं सांगितलं, गोड खाणं या जन्मीं सोडा. परमेश्वरानंच सांगितलं नाही तर काय ? अहो, त्यानंच तर माझीं सारीं सूत्रं हातीं घेतलीं होतीं !

गोड खायचं नाही, ज्यांत ज्यांत म्हणून साखरेचा अंश

आहे, तो तो पदार्थ खायचा नाही. फळं वर्ज्य ... !

" अरे, कोण आलंय् रे तिकडे ? कुसुम ? वा ! वा ! पोरी, अगदी वेळेवर आलीस ! किती दिवसांत भेटली नाहीस. ये, ये; खूप खूप बोलूं. हं, किती लिहून झालं तुझं ? ... "

" बापू, डॉक्टर म्हणाले की, तुम्हांला काकडी खायला हरकत नाही. ही पहा मी एक कोवळी, सुन्दर काकडी आणली आहे; माझ्या घरच्या वेलीची ! देऊं ना मग मी मिरी लावून ? मग हवं तेवढं बोलूं आपण. आज इथंच तुमच्याजवळ राहणार आहें मी. "

कशी पोर आहे ही ? अग, वेड हें आता खाणाबिणं कशाला ? शरीर काम करायचं टाळतं, कशाला त्याचे लाड पुरवूं ? मरूं देना ?

" घ्या, घ्या, ही उशी मी भिंतीला टेकून ठेवतें. उठून बसा ना ! —एक एक फोड देते मी. "

बसलीच की चिरायला. एका बशींत मीठ, दुसरींत मिरपूड, कोवळ्या हातांत कोवळी काकडी.

देठाजवळची वडी चिरली. काकडीवर घासून फेसाळली. काय म्हणतीस ? — कडूऽजा, गोऽड ये— कडू जा, गोड ये ! "

" अग, अशानं का काकड्या गोड होतात पोरी ? "

" नाही, पण आपली इच्छा ही नेहमी चांगली असावी."

अरे, पण हें काय ? माझे डोळे आत आंत काय बघतात ? माझं हृदय पाहूं ? काय आहे त्यात ? हा एवढा प्रकाश कशाचा पडला ? हें इतकं रक्त कुठून आलं माझ्या शरिरांत ? ही उत्साहाची विहीर कुठल्या झऱ्यांनी भरून आली ? असं सशक्त झाल्यासारखं मला कां वाटतं ? झालंय् काय सारं ?

कुसुमचा हा शुभकामनेचा सिद्धांत ! त्याचा तर प्रभाव नसेल ना ? ही जादू त्याने घडविली ?

दुरितांचें तिमिर जावो । विश्व स्वधर्मसूर्यें पाहो ।
जो जें वाछील तें लाहो । प्राणिजात ।

आणखी ही कुणाची आकृति ? हा तो जर्जर झालेला, म्हातारपणाने खंगलेला कर्मयोगी यूलिसस ! नव्हे का ? काय म्हणतो तो.

" Something are the end ,
Some note of noble work
may yet be done ,
I will drink my life to the lees ! "

मग माझंच वय झालं कीं काय ? मी इतक्या लवकर कां मरावं ? मी स्वार्थी नाही का ठरणार ? मरण्याची इच्छा हा अतिशय पापप्रद असा स्वार्थ आहे. चला उठा, लागा कामाला.

कोण आहे रे तिकडे ? अरे या पोरीला पुष्कळशा काकड्या

## यौवन

आणून द्या व तिच्या वाणीने सारे लोक ऐका—

" कडू जा. गोड ये - कडू जा. गोड ये—"

हा मी जातों आणि आणतों माझ्यासारखे मरतुकडे बोलावून !

आपली कामना शुभ असावी ! असल्या भुलावणीने जर शरिरांत रक्त येत असेल, जोम येत असेल, पिकलीं पानं गळून जर नवी येणार असतील, तर ही भुलावणदेखील एक महान् सत्य कां समजूं नये ?

२६-१०-३८

— २ —

# शुद्धि !

मी सगळें कांही सांगेन, पण एका अटीवर. ती अट एवढीच की, हे सगळं मला कुठून नि कसे कळले हा प्रश्न आपण मला विचारूं नये. त्या प्रश्नाचे उत्तर माझ्याकडून आपल्याला मिळावयाचे नाही. असल्या गोष्टी युगांतूनदेखील एखाद् वेळींच घडतात.

थांबा; इथे गॅलरींतच उभे राहूं या आपण. आता दहा वाजून वीस मिनिटें झालींत. बरोबर पांच मिनिटांनी मी माझ्या हकीगतीला सुरुवात करतो; कारण जिचें मी वर्णन करणार, तीच तुम्हांला आता पहायला मिळेल.

असे समोर या. ती पहा डाव्या बाजूने शांतपणे येत आहे. ती इथे येईल, तेव्हा साडे दहा वाजायला नक्की पांच मिनिटे असतील व बरोबर साडे दहाला ती आपल्या शाळेच्या आवारांत पाऊल टाकील. तिच्या पावलांत घाई नाही. डोळ्यांत चंचलता नाही. तिला पक्कें ठाऊक आहे की, ती जायच्या अगोदर कुठल्याहि घड्याळांत साडेदहा वाजायचे नाहीत.

# यौवन

आणि इतक्याच नियमितपणें बरोबर सव्वातीन वाजतां याच रस्त्याने परत जातांना ती तुम्हांस दिसेल. तशीच शांतपणें ती जाईल. प्रो० फडक्यांना तुम्ही तिचे वर्णन करायला सांगा. तुम्हांला वाटेल ह्चियाशी आपला परिचय वाढलाच पाहिजे. खांडेकर वर्णन करायला बसतील, तेव्हा फुलबागेतील साऱ्या लिबांची रसरशीत कांति आणि फुलवेलींची कृशता त्याना वर्णावी लागेल आणि माडखोलकर तर 'एलिस' व 'ब्लांच' चे निर्वाळे देत सुटतील.

कारण तिचें वर्णन करणें कठीण आहे. कोणतेंहि सुगंधि लेपन न लावतां मुबलक गार पाण्याने आंघोळ केल्यावर शरिराला जसा एक प्रकारचा मदिर थंडपणा येतो—सुगंध दरवळतो, तशा प्रकारचा विशिष्ट सुगंध तिच्याभोवती सतत दरवळलेला तुम्हांला भासेल. बकुळीचीं फुलें सुकतात, पण सुवास सोडीत नाहीत. तिचेंहि तसेंच कांहीसें झाले होतें!

होय, मी सांगत होतों—सव्वातीनला ती पुन्हा या रस्त्याने जाताना दिसेल. साडेतीनला घरीं पोचेल. गेल्याबरोबर आंघोळ करील व लिंबाचें सरबत घेऊन कामाला लागेल. स्वतःच्या खोलींत जातांनाच ती डाव्या बाजूच्या खोलीकडे पाहून थबकेल व कुलुपावर तिची दृष्टि स्थिरावेल. ती खोली तिला आता मुळीच उघडावयाची नाही. तिने ती सकाळींच उघडली,

झाडली, सारवली; आंत फुलें ठेवलीं आणि पुनः बंद केली. रोज ती असेच करते व अशीच त्या कुलुपाकडे पाहते. त्या काही सेकंदात तिचें सगळें आयुष्य सामावलें असते व त्या आयुष्याचा मूकपट ती झरझर पाहून घेते.

त्या खोलींत एक फोटो आहे. तो तिच्या सख्ख्या भावाचा. त्याचे नांव अरुणकांत. निष्ठेसाठी, तत्त्वासाठी तो जगला व तत्त्वापायीच गेला. त्याच्या जीविताची सगळी कहाणी पांढऱ्या शुभ्र वस्त्रासारखी आहे. पाढऱ्या कापसांतून निघालेलें, पिंजलेलें, अनुभवांच्या कलाबतूने गुंफलेले व खळ न लावतां बाजारात आणलेलें खादीचें शुभ्र वस्त्र! त्याची उभी हयात ही अशी आहे. त्यागाची मूर्तिमंत प्रतिमा !– कुठल्याहि मलिन वासनाचा व कल्पनांचा त्याला स्पर्श झालेला नव्हता—त्याने होऊं दिला नव्हता. कोणतीहि वाईट गोष्ट नाहीशी करतांना आपली शक्ति व आपले प्राण कितपत उपयोगास येतील, हेंच पाहण्याची त्याची प्रवृत्ति होती.

म्हणूनच त्याच्या मृत्यूची बातमी सगळ्यांना दुःखद व अद्‌भुत वाटली. एका सकाळी अशी भुमका उठली की, त्याचे सगळे शरीर त्याच्या खोलीतच रक्ताने भिजलेले आहे व गळ्याला मोठी जखम —

सर्वांनी तें पाहिलें !

## यौवन

त्याला कुणी मारलें ? त्याला शत्रु तरी कोण होता ? कुणीच नाही. घरीं एकुलतीं एक अत्यंत लाडकी— त्याच्यापेक्षा फक्त तीन वर्षांनी लहान असलेली त्याची बहीण निर्मला— जी मी मघाशीं तुम्हांला दाखविली, जिचा त्याने प्राणाच्या जोखमेने प्रतिपाळ केला, जिला त्याने आईची आठवण कधी होऊं दिली नाही.

—आणि जिच्यासाठी त्याने स्वतः अंतःकाळीं रक्ताने आंघोळ केली व देह अर्पिला !

येवढी हकीकत ऐकल्यानंतर आता तुमची कल्पनाशक्ति मोकळी सुटायला हरकत नाही. तुम्हांला वाटेल एखाद्या गुंडापासून आपल्या आवडत्या बहिणीचें रक्षण करतां करतां त्याला मृत्यु आला असेल व त्याच्या जिवाचें सोनें झालें असेल: दुसऱ्यादा वाटेल, त्याच्या सख्या बहिणीवर त्याचें प्रेम असेल; तिचाच त्याला सतत सहवास होता. स्त्रीबद्दलच्या सगळ्या भावांची केंद्रता तिच्याच ठिकाणी झाली होती. त्याला तिचें आकर्षण असेल. त्याला ती हवी असेल; तथापि, त्याचें आतापर्यंतचे आयुष्य, त्याचीं तत्त्वें, समाज व माणुसकी या गोष्टींला संमत नसतील व या कारणामुळे त्याने मृत्यूला मिठी मारली असेल. तुमच्या या तर्काला पुष्टि देणारें बरेंच वाङ्मय युरोपमध्ये निर्माण झालें आहे.

तथापि, तुमचा तर्क मोठा अजब व मौलिक असला तरी तो खोटा व असभ्य आहे.

तुम्हांला त्याच्या एकंदर चारित्र्याची कल्पनाच आलेली नाही. तुमच्या रोजच्या आयुष्यांत तुम्ही पत्नीसाठी, मित्रासाठी, देशासाठी प्राण द्यायला तयार असतां; पण पत्नीने तुमचे फाउन्टन्पेन, मित्राने तुमचें चित्राचे अल्बम किंवा देशाने एक वर्षाची कैद मागितली, तर ती देण्याची आपली तयारी नसते. असत्य, ढोंगी नि निःसत्त्व अवडंबरांनी आपले आयुष्य बरबटल्यामुळे आपल्याला प्राण देणे म्हणजे खरोखरच मरणें, या शब्दप्रयोगाचा अर्थ कळूं शकत नाही. तो कळण्याची आपली कुवतच नाहींशी झालेली असते आणि म्हणून असलीं तर्कटें आपल्या डोक्यांत येतात.

खरी गोष्ट दुसरीच आहे व तीच ऐकण्यासारखी आहे.

तुम्ही या निर्मलेला ती पंधरा वर्षांची असतांना पाह्यचें होतें. पंधरा वर्षांच्या इतर पुष्कळशा मुली तुम्ही पाहिल्या असतील. उमललेलीं फुलें सुंदर, हवींशीं वाटतात–पण उमलतीं याहूनहि लोभनीय असतात ! या वयांत संध्याकाळचा पश्चिम दिग्भागाचा रक्तिमा आकलन करण्याची थोडी थोडी शक्ति उमलत असते. ऊबदार बिछान्यावर एकटें झोपतांना अस्वस्थ वाटतें व तें का वाटतें तें कळत नाही; स्वतःच्या शरिरापेक्षाहि

दुसऱ्याचीं शरिरें चांगलीं वाटतात आणि याचेंहि कारण कळत नाही.

याच वयांत निर्मलेचा इतिहास लिहिला गेला. नदीचे पाणी वहात होतें. ती शेतांत गेली होती. थकली. तिला तहान लागली. तहानेनें व्याकुळ होऊन ती गुडघाभर पाण्यांत उतरली. पोटऱ्या उघड्या, ओंजळ भरायला ती वाकलेली. ओठांपर्यंत ओंजळ भरून आणीपर्यंत ती रिकामी होऊन जाई. ( त्या कमळासारख्या नाजुक हातांत पाणी धरून ठेवण्याची शक्तीहि आली नसेल ) तिची कोण तारांबळ ! धुणीं धुवायला आलेल्या बाया हसल्या; बैल पाण्यावर आणलेला शेतकरी हसला; नदी-तल्या लहान मासळ्या तिच्या पायाशीं जमल्या; ती घाबरली व ओली झाली !

त्या मुग्ध संभ्रमांत ती असतांना एक सोळा वर्षांचा मुलगा तिच्या जीवितकथेच्या या पानावर आला. त्याचे नाव मला विचारूं नका. मी सांगणार नाहीं. तो आला. थोड्याशा गमतीने, थोड्याशा गंभीरतेने तो पाण्यांत उतरला. हिला त्याने धीर दिला व स्वतःच्या ओंजळीने तिला त्याने पाणी पाजलें. ती आकंठ प्याली. तिने भोवताली पाहिले नाही व पाहिलें तें पुनः नजर खाली करण्याकरताच.

हे ओल्या मातीवरचे ठसे असतात. फार लवकर उमटतात.

तिच्या ओठाला त्याच्या कराग्राचा झालेला नाजुक स्पर्श, फुंकरीने दुधाला खळी पडावी, तशी बोटांनी पडलेली ओठावरची वलयें.

ती कांही केल्या पुसलीं जाईनात. तिने तीं पुनः चाचपून पहावीत आणि पुनः ती उमटावीत– आणि तिच्या त्या वयांत तर स्वतःपेक्षा दुसऱ्याचींच शरिरें सुंदर वाटतात. पुढे या व अशाच गोष्टी पुष्कळ घडत गेल्या. त्या कुणाला सागाव्याशा वाटत नाहीत. सांगितल्या तर दिठावतील – करपतील, अशी भीति वाटते. पोटांत ठेवल्यावर अननुभूत आनंद होतो. नवथर लहरी मनांत उठतात. सगळें रोमांचित झाल्यासारखे वाटते, सगळे नवें– सगळे अद्भुत– सगळे हवेसे !

तथापि, अशा गोष्टी न सांगतां कळत असतात. तशा त्या अरुणकांतालाहि कळल्या. त्याने कोणतीं नीतितत्त्वें उराशीं धरलीं होतीं त्यालाच ठाऊक; त्याने सगळया घटनेचा आनंदाने स्वीकार केला. या बाबतींत निर्मलेला कांहीं सांगावें लागेल, अशी त्याला कल्पना नसल्यामुळे त्याला थोडा विषाद वाटल्यावाचून राहिला नाही. त्याने निर्मलेला बोलाविलें; कोण संकट वाटलें त्याला ! किती यातना झाल्या ! शब्द तोंडीं येईनात; कितीहि ‘ प्रज्ञा प्रतिष्ठित ’ झाली असली, तरी अशा वेळी माणूस अखेर खचतो व विरघळतो. देवाने रक्ताचे संबंधच

असे विचित्र करून ठेवले आहेत.

निर्मलेला तो त्याच ओढयावर घेऊन गेला, जिथे तिची तहान शमली होती. पाठीवरून हात फिरवीत अगदी वात्सल्याने गद्गदून त्याने सांगितलें, 'वेडे पोरी, कधीतरी हें मला सांगावेंच लागलें असतें, तें आता या घटकेला मी सांगणार आहे. तूं निर्मल, चारित्र्याशील व्हावेंस, असें मला वाटतें, ही माझी चूक नाहीं; पण तसें तूं वागावेंस म्हणून मी पूर्वजांचा, घराण्याचा दाखला वेठीस धरीत नाहीं. आपण सृष्टीचीं मुलें आहोंत. तिचीं इतर मुलें जशीं वागतात, तसें तुला नि मला वागले पाहिजे. हें पहा, तुझ्या पायाशीं एक छोटेसें रानफुलाचें झाड आहे. तूं त्याच्याकडे सुगंधाच्या दृष्टीने पाहतेस. मी श्रमाच्या. तें फूल हसतें आहे; कारण त्याचें जीवितकार्य सफल व्हायला आलें आहे. आज सायंकाळीं तें सुकेल; पण जातांना एक बीज येथे ठेवून जाईल. पुढील वर्षीं याच ठिकाणीं तुला असेंच झाड व फूल फुललेलें दिसेल. ही नदी—ती तुला सांगते—" तुझ्या प्रियकराला ओंजळीने पाणी पाज, त्याच्या ओठांना तुझ्या हातांचा स्पर्श होऊं दे–" पण ती स्वतः काय करीत आहे? आजूबाजूचा सगळा भाजीपाला ती पोसते! ही पालवी– ती सांगते आता थोड्या दिवसांनी आम्ही तुम्हांला फळें खायला बोलावूं. निर्मला, सृष्टीचीं सगळीं बाळें उपयोग म्हणून जगतात. आपल्याला

उपभोग म्हणून जगण्याचा अधिकार नाही. हें तुला पहिलें आणि शेवटचें सांगणें आहे आणि तुझी दृष्टि एकदा अशी झाली की, तूं कशीहि वागलीस, तरी मला त्याची फिकीर नाही. नीति आणि चारित्र्याच्या पोकळ व्याख्यांनी थोडेच जगायचें आहे आपल्याला ? ”

हें त्याचें पहिलें व शेवटचें सांगणें होतें !

अरुणकांताचें वय चोवीस. तिचें एकवीस. निर्मलेच्या तारुण्याला अगदी बहर आलेला. घरीं सगळी स्वतंत्रता, सोन्यासारखा भाऊ, त्याच्या धवल कीर्तीची पाठराखण. पांच वर्षाचें एक दीर्घ स्वप्न निर्मलेला पडलें. त्या स्वप्नांतला एक मोहक दिवसहि तिनें अनुभविला. त्या दिवशी घरीं ती एकटी होती. कुणी कुणी परकें नव्हतें. प्रणयाच्या विभ्रम लीला तिला अवगत झाल्या होत्या व प्रियकराच्या मधुर सहवासाची तिची तहान शमत नव्हती.

आकाशांतले ढग लाल झाले. सूर्य थकून खाली आला. चंद्राचा पत्ता नव्हता. त्यांची रात्र त्या दिवशीं दोन घटका अगोदरच झाली. स्वतःच्या सुकोमल हातांनी तयार केलेला विस्तीर्ण मऊ बिछाना, त्यावर हातभर थरावलेलीं गुलाबाचीं उमललेलीं फुलें– त्या फुलांच्या विलग झालेल्या पाकळ्या—

आणि असल्या बिछान्यावर एकटें झोपत नसतें कुणी !

आयुष्याची सगळी कहाणी तिला एका शब्दानें सांगतां

आली – विलास—भोग !

ते अवघे स्वप्नापेक्षा मधुर होतें; कारण सर्व खरे होतें ! जीवनाचा यापुढील एकमेव हव्यास तोच–आयुष्याची परिणति तीच–जगण्याचे साफल्य तेवढेंच–रोज रोज सुधा प्यायची आणि रोजचीं गुलाबाच्या शेजेची स्वप्नें !

हे ओल्या मातीवरचे ठसे असतात. लवकर उमटतात व त्यांच्याशिवाय त्या मातीला वेगळें अस्तित्व उरत नाही.

हे सगळें असें कसें व का झालें, असा प्रश्न जर तुम्ही मला विचाराल, तर आपण अननुभवी आहात, असें मला सांगावें लागेल. निर्मलेच्या भावाचा व तिचा जीवनविरोध दर्शविणार असाल, तर प्रतिक्रियेचें एक शास्त्र असतें, याची जाणीव आपल्याला करून द्यावी लागेल. थोरल्या भावाने जीवनांतलीं सगळीं उत्कृष्ट तत्त्वे प्रयोगाकरिता घेतलेलीं, त्या प्रयोगवीराचे हटातटाचे सर्व प्रयत्न, त्याचा तो हव्यास आणि त्याच्याच खोलीजवळ याच्याच सान्निध्यांत रहात असलेली निर्मला— पण यांत विचित्र, विलक्षण कांही असलें, तरी ते खरें असल्यामुळे त्याचे पृथक्करण करण्याचें मला कारण नाही.

या घटनेला काळ लोटला. अरुणकांताचें मन इतकें संकुचित कधीच नव्हतें की, निर्मलेच्या रोजच्या वर्तनावर त्याने देखरेख ठेवावी. त्याला वेळहि नव्हता. उलटपक्षीं चारित्र्यशील भावा-

पासून कांही लपवितां येण्यासारखी निर्मलेची मनोवृत्ति नव्हती. जे आपल्याला साधत नाही तें साधलें, साधलें, म्हणून प्रतारणा करण्याची तिची तयारी नव्हती. उलट तें सगळें कबूल करण्याचें धैर्य तिच्या रक्तातच होतें !

म्हणून केवळ नाइलाज झाला—सांगावेंच लागलें म्हणून नव्हे तर त्याच्या फार फार पूर्वी तिने सगळया गोष्टी तितक्याच उत्कटतेने आणि प्रामाणिकपणे भावाला सांगितल्या. तें पत्र अरुणकांताने वाचलें व त्याचाहि स्वीकार केला. निर्मलेने सर्व गोष्टी स्पष्टपणें लिहिल्या होत्या—" दादा, रागावूं नका. हें मला सारें हवेंसें वाटतें. सगळें शरीर थडथडतें. सगळया भावना फुलून येतात; ही शरिराची भूक. असले प्रसंग इतक्या लवकर कुणावर येऊं नयेत, ही भूक ज्याला लागते, त्याच्या सगळया जीवनाची 'दारू' होते !—" तिने पुष्कळ पुष्कळ लिहिलें.

अर्थात् अरुणकांताने तेंहि स्वीकारलें. जें सांगावयाचें तें शेवटचेंच असल्यामुळे पुनः निर्मलेला कांही सांगण्याची त्याला आवश्यकता वाटली नाही.

दुसऱ्या दिवशीं त्याने निरवानिरव केली. सर्वांना ती एक सहज गोष्ट वाटली. त्यापेक्षा आपल्याला आणखी वाटणार तरी काय ?

तिसऱ्या दिवशीं मनाच्या शांतीसाठी, स्थैर्यासाठी त्याने मौन स्वीकारलें.

चौथ्या दिवशीं बहिणीची नीट व्यवस्था लावून दिली डोळयांतून टिपूसहि न गाळतां सुखदुःख, यश अपयश सारखें समजणाऱ्या स्थितप्रज्ञाप्रमाणे त्याने बहिणीचा निरो घेतला. दारूच्या धुंदींत असलेली निर्मला थोडा वेळ शुद्धीव आली व बोलली.

त्या दिवशींचा त्याचा तो शेवटचा प्रयोग. आता पुढील प्रयोगाकरिता त्याच्याजवळ आयुष्य उरणार नव्हतें. एक अमर तत्त्वाच्या सत्यतेची कसोटी तो त्या दिवशीं पाहणार होता तत्त्वाच्या सख्यत्वासाठी प्राणाची कुरवंडी करण्याची त्या तयारी केली. त्याची त्या दिवशींची शांतता–गंभीरता–तें स वर्णनातीत आहे. त्याने निर्मलेसाठी पत्र लिहून ठेवलें व खोलीचं दार लावलें. त्या पत्रांतील वाक्यें आज निर्मला पुनःपुन्ह वाचते. सांजवाती लावल्या की, ती म्हणते— ' प्रिय निर्मला तूं सगळे खरें सांगितलेंस. तूं माझीच बहीण आहेस. शरिराचं न शमणारी भूक— तुझें वर्णन खरें असेल; पण अशी मुलखा वेगळी भूक ज्या शरिराला लागते, त्या शरिराने स्वतःचे रक्त–मांस खाऊन टाकावयास हवें. तुझ्या मृत्यूची कल्पन या वेळीं तुला भिववील; कारण तूं त्याला बळी पडली आहेस तूं आता ' मला जगण्याचा हक्क आहे, ' अमलीं अपुरीं तत्त्वं माझ्या तोंडावर फेकून देशील. शरिराच्या या भुकेच्या तृप्तीसाठ

शरीरच हवें. तुझी तें द्यायची मुळीच तयारी नाही. तेव्हा त्या शरिराशीं रक्तामांसाने जवळ असलेलें माझें शरीर मला देणें आहे. त्यामुळे तुझी भूक शमेल व माझें सार्थक होईल. माझ्यापेक्षा तूं नंतर पुष्कळ कामें तृप्त मनाने करूं शकशील. ”

निर्मला बाहेरून आली. तिने तें वाचलें. तशीच ती अरुणकांताच्या खोलींत गेली.

तिथे सगळें रक्त ! त्या रक्ताचा रंग दारूपेक्षाहि लाल होता. तिची नशा खाडकन् उतरली. भुकेचा मागमूसहि राहिला नाही.

हेच, हेच रक्ताचे डाग पुसले जावेत, म्हणून आता रोज सकाळीं निर्मला अरुणकांताची खोली सारवून ठेवते, तो रक्ताचा वास नाहीसा व्हावा म्हणून ती रोज त्यांत सुगंधी फुलें ठेवते. बाहेरची अपवित्र हवा आंत जाऊं नये, म्हणून रोज ती खोली बंद ठेवते.

दारूच्या सगळ्या बाटल्यांतून आता तिने गंगा भरून ठेवली आहे. पांच वर्षांचें सगळें ‘ कश्मल ’ त्या प्रसन्नपुण्य गंगाजलाने ती धुवून काढील व दोन शरिरांचीं कामें आता ती एकटी करील. ती स्वतः जगणार आणि अरुणकांतालाही जगविणार.

दुसऱ्याच्या उपयोगी पडण्यासाठी पर्वताच्या कडेकपारींतून खळाळत बाहेर येणारी ती नदी आहे. ती समुद्राला मिळण्याच्या

## यौवन

अगोदर तिच्यांतलें सगळें ' जीवन ' उपयोजिलें जावें, अशी तिची प्रतिज्ञा. सातासमुद्राच्या पलीकडे राजाने पेरलेलें तें केळीचें झाड आहे; तें हालेल पण मोडणार नाही. त्याला पाणी मिळेल, मिळणारहि नाही. तरी तें सुकायचे नाही.

ज्या नद्या हिमालयांतून निघतात, त्यांना उन्हाळयांत पूर येतो. जी झाडें रक्ताने पोसलीं जातात, तीं पाण्याविनाच फुलतात व आपलीं फुलें, फळें, सावली— असेल नसेल तें सगळें दुसऱ्याला देऊन टाकतात.

ता. १६-१०-१९४१

—३—

# एक अनावश्यक गोष्ट

हस्त नक्षत्र संपत आलें होते. पावसाचा संभव नाहीसा झाला होता. दिवाळीची सावली वातावरणांत विरल विरल दिसत होती.

पहाटेचा कोरडा परंतु थंड आणि मंद वारा वहावयास सुरुवात झाली. झाडांचीं पानें सळ–सळ आवाज करीत आपल्या नादांत नाचूं–गाऊं लागलीं. दिवाळीचा आनंद त्यांच्यावरही टवटवला होता. जीव उघडा करून कुणालाही असेल नसेल तें सांगून टाकावेसे वाटे !

उन्हाच्या ऐन भरांत उष्णतेने काहिलून सुस्कारीत असतांना नांगराचा फाळ पोटांत खुपसला गेला, त्या वेळी पृथ्वी विव्हळली असेल; पण आज धान्याचा कोंब फुटल्यामुळे जन्मदात्रीचा आनंद तिच्या मुखावर विलसत होता. कधीतरी जीव आसुसून डोळ्यावाटे अश्रु पाझरल्यावर आनंदाचा उन्मेष जिवाला हसवून जातो. बालरवीचीं उगवतीं कोवळीं किरणें ओठ विलग करितात, पण मावळत्या किरणांनी उगीच डोळ्यांत

आसवें उभीं राहतात ! निसर्गाच्या आपापतः घडणाऱ्या या दोन्ही परिणामांत सुखदुःखाचे झिरपे झरतात. त्यांची सीमा-रेषाहि दिसत नाही !

त्या प्रशस्त आणि भव्य बंगल्याच्या दुसऱ्या मजल्यावरील पश्चिमेकडच्या खोलींत एका पलंगावर तीसबत्तीस वर्षांची तरुणी डोळे मिटून स्वस्थ पडली होती. आजारामुळे तिचा चेहरा सुकून गेला होता. पण ती कृशतादेखील तिच्या हेमकांतीला शोभा देत होती. तिने मऊशी दुलई छातीपर्यंत ओढून घेतली होती, त्यामुळे वातावरणांतील गारवा तिला सुखदच वाटे. पश्चिमेकडच्या खिडक्यांचे निळे पडदे ओढल्यामुळे वारा आंत येऊं शकत नव्हता. एखादी झुळुक आंत डोकावून तिच्या केसाशीं खेळून जाई. सूर्यकिरणेंदेखील मार्ग बंद झाल्यामुळे पडद्याआडच थबकलीं होती. त्या वेळीं त्यांच्या हसऱ्या डोळ्यांचा जेवढा प्रकाश पडेल, तेवढाच फक्त आंत येत होता.

खोलीचें दार हलूच किलकिलें झालें आणि पुनः लोटले गेले. एक सोळा वर्षाचा तरुण आंत आला. त्याची कांति रसरसलेल्या लिंबासारखी मोहक होती. त्याच्या आणि तिच्या तोंडावळ्यांत विलक्षण साम्य होते. फक्त गांभीर्याचा अंश तरुणीच्या डोळ्यांत थोडा अधिक दिसे !

त्याने हातांतलें पुस्तक स्प्रिंगच्या खुर्चीवर ठेवलें व तिच्या

पलंगावर टेकून तिला हळूच हाक मारली, " ताई ! "

ताईने डोळे उघडले नाहीत. तो हलकेच उठला आणि खुर्चीवर बसून त्याने पुस्तक उघडलें. तो भराभर पानें चाळीत होता. त्याचे विशाल डोळे प्रत्येक अक्षर आंत खेचून घेत होते. थोड्याच वेळांत तो भोवतालचें जग विसरला.

ताईचे डोळे हळूच उघडले गेले आणि तिची पहिली नजर अविनाशवर खिळली. जगाला संदेश सांगणाऱ्या प्रेषिता-सारखा तिला तो त्या वेळीं दिसला !

किंचित् मान उंचावून तिने त्याच्या पुस्तकाकडे पाहिलें, पण नांव दिसत नव्हतें. आज तीन दिवसांपासून ती त्याला पुस्तक वाचण्यांत मग्न झालेला पहात होती. ती जागी होईपर्यंत तो तें पुस्तक वाची आणि नंतर परत जाई. तिला जिज्ञासा उत्पन्न झाली.

" अवि, कसलं आहे रे तें पुस्तक ? " अविनाश आपल्या तंद्रेंतून जागा झाला. त्याने पुस्तक चटकन् लपविलें व हसत हसत तो ताईकडे आला.

" केव्हा जागी झालीस तूं ? ताई कसं वाटतय् तुला आता ? आज बरं आहे नाही का ?

" मला पुस्तकाचं नांव सांग. नीटसं दिसलं नाही मला तें... Chemical... नि पुढे काय ? "

" काय करायचं आहे तुला ? खरंच तुला आनंदांत पाहि-ल्यावर मला किती बरं वाटलं— माझी ताई तूं ! "

त्याने ती गोष्ट सफाईने बाहेर फेकली. तिचे केस सावर-ण्याच्या मिषाने त्याने तिच्या डोळ्यापुढे हात आणला. तिची शोधक दृष्टि आपल्यावरून काढून घेण्याची ती त्याची युक्ति होती.

" अवि ! माझ्याशी टाळाटाळ करतोस ? तुला काय वाटतं, मला त्या पुस्तकाचं नांव माहीत नाही ? माझ्याजवळून परवा नेलेले ५० रु. व त्या पुस्तकाचें पहिलें अक्षर यांचा संबंध मला सहज कळूं शकतो. "

" ताई, उगीच डोक्याला त्रास देऊं नकोस. आता कुठे तुला थोडंथोडं बरं वाटायला लागलं आहे. तें पुस्तक म्हणजे काय आम्हांला recommend केलेलं chemistry practi-cal चं आहे. "

" अविनाश, " ताई त्याच्यंयावर नजर रोखून पण प्रेमळपणाने म्हणाली, " मला फसवूं नकोस. चार दिवसापूर्वी तुझ्याजवळ पोटॅशियम सायनाइड व आर्सेनिक आणण्याकरिता मिळविलेले परवाने पाहिलेत मी ! "

" मी सायन्सचा विद्यार्थी आहे, हे तूं विसरतेस. बरं मी दूध आणतो तुझ्यासाठी. तूं पड स्वस्थ. "

अविनाश जावयाला उठला. ताईच्या लक्ष्यांत ही गोष्ट चटकन् आली. तिच्या खोल हृदयांत कसलीतरी चाळवा-चाळव झाल्यासारखे तिला वाटले; परंतु वर कांहीच न दाख-वितां ती शांतपणें म्हणाली—

" मला कांही नको. फक्त तेवढ्या उशा माझ्या पाठीशी लाव. मी टेकून बसतें जरा ! "

विषयांतराची आयती आलेली संधि त्यानें दवडली नाही. अगदी तत्परतेने तें सारें केलें आणि आपण जावयास निघाला. तिने त्याला जवळ बसवून घेतलें. तिची दृष्टि शून्यांत विलीन झाली होती. मंद निःश्वासाशिवाय तिने किंचित्काल कसलीही हालचाल केली नाही. एखाद्या सुंदर आणि हृद्य देखाव्याकडे दृष्टीचा वेध लागावा आणि तिचें प्रतिबिंब नेमकें आपल्या मुखावर उठावे तसे तिच्या डोळ्यांत सुखदुःखाचे भाव तरंगतांना दिसले.

अविनाश तिच्याकडे अनिमिष नेत्रांनी पहात होता. तिला ते जाणवलें, तिने नजर वळविली.

" अवि, कसले उद्योग आरंभले आहेस तूं. आज मोत्यांचा घास तुला मिळतो आहे. "

" मघापासून मी तो विषय टाळण्याची शिकस्त करीत आहें; पण तूं मात्र विसरली नाहीस. " तो एकदम म्हणाला.

" तुला काय म्हणायचं आहे, हें कळतें मला. श्रीमंतींत मुरलेले हे भित्रे विचार... "

" अहं, तसं नाही रे,— पण एका लक्षाधिशाचा मुलगा तूं. बाबांना काय वाटेल उद्या तूं असलं बरंवाईट करूं लागलास तर ? "

" काय वाटायचं आहे ? वाईट वाटेल ! रडतील थोडा वेळ !! आणखी ? पण कर्तव्याचें सुख मला मिळेल. मेल्याचं दुःख नाही वाटायचं. दिव्यावर झडप घातल्याचीच धडाडी-न विझेना दिवा. "

हरवलेल्या मोतीमाणकांचा खूप शोध करूनही पत्ता लागू नये आणि एकदम तीं हातीं लागली, म्हणजे विस्मयचकित होऊन आपण त्यांच्याकडे संशयगर्भदृष्टीने पहात राहतों, तसलीच छटा ताईच्या चेहऱ्यावर उमटली; पण फार थोडा वेळ !

" मला नाही आवडत या गोष्टी अविनाश ! माझ्यापासून तूं दूर रहावास ही कल्पनाच सहन होत नाही मला. "

" कशी होणार ताई ? माझ्यापरता जग माहीत नाही. कोणताही Vision समोर नाही. श्रीमंताची पोर. तुला लोकांच्या उपासमारीच्या किंकाळ्या काय ऐकूं येणार आहेत ! फुलांत लोळणारी तूं ! गुलालाच्या पडद्यांतून तुला बाहेरचे रुधिरप्रवाह कसे दिसतील ? "

" पुनः आलास आपल्या मूळ पदावर. काय करावयाचं तें इथून करतां येईल तुला. पैसे आहेत तुझ्याजवळ. परवा तुमच्या × × × करिता नाही तूं मला ५०० रु. मागितलेस ? "

" अहा ! काय उपकार केलेस मोठे ५०० रु. दिले तर ! आतापर्यंत गरिबांचा पैसा दडपून बसलों. त्याचा एक सहस्रांश-देखील भाग नाही हा. कसली सहानुभूति नि आभार मानायचे तुझे ! "

" मला कळतं आहे सारं. "

" ताई, कांही कळत नाही तुला— तुझं वाचन दांडगं असलं, तरी तुझं वातावरण तुला विचार करूं देत नाही. मला राहून राहून माझ्याबद्दल धन्यता वाटते. देवाने माझं रक्त मात्र इतकं मेलेलं दिलं नाही. एरव्ही मीदेखील तुझ्यासारखाच बोललों असतों.... "

" अवि, मी कांहीतरी बोलत नाहीं. सारं अनुभविलं आहे मी. काय अनुभवावयाचं राहिलं आता ? — " तिचा गळा भरून आला होता. अविनाशकडे पाहतांच वात्सल्याचा उमाळा येऊन तिने वरील शब्द कसेबसे उच्चारले. " तूं लहान होतास. तुला कळत नव्हतं; पण तुझी प्रत्येक हालचाल माझ्या नजरेंतून सुटली नाही. पिलाला पंजाच्या बाहेर सोडून त्याच्याकडे पहात बसणारी सिंहीण !– त्याच नजरेने मी तुझ्यावर अवधान ठेवलें होतें.

तुझाच वेध होता मला; पण या पंधरा दिवसांतली तुझी एकंदर वागणूक पाहून मला तुझी भीति वाटायला लागली. दुखलेलं मन कुणाच्यातरी आसऱ्याला धावून येतं— परवा तुझ्या वाढदिवसाच्या दिवशीं तुला ओवाळतांना माझा हात थरथर कापला. ”

“ ताई ! काय बोलतेस तूं हें ? काय दिसलं तुला माझ्या वर्तनांत ? तुला कुठे सोडून चाललों आहें मी ? कल्पना तरी कशी आली तुला ? त्या बाटल्या मी लॅबोरेटरीतून मुद्दाम नीट तपासावयास प्रोफेसरांकडून आणल्या आहेत. ”

“ तुझ्या पेटींत मला परवा विश्वास रानडेचा फोटो दिसला. ”

“ ते माझं दैवत आहे ताई ! त्यांची धडाडी दुर्दैवाने माझ्यांत नाही. त्यांच्या मानाने माझें रक्त कमालीचं थंड आहे. मग ते काश्मीरला जन्मल्यामुळे कीं काय न कळे— पण मला जो विलक्षण आदर आहे त्यांच्याबद्दल, तो केवळ त्यांचा त्याग अलौकिक व बुद्धि असामान्य म्हणून ! ”

“ तुझा आदर अनाठायीं नाही. बाळ, पण तो फोटो तुझ्याजवळ... ”

“ आलं तुझं स्त्रीहृदय तुझ्या मदतीला. मोठी धीराची म्हणवितेस आणि आता तुझ्या आवाजांत कापरेपणा कां म्हणून ? परवा तूं मला नेपोलियनचं वाक्य वाचून दाखविलंस— What a ballad my life has been— ते वाक्य

माझ्या करिता नव्हतं वाटतं ? ”

अविनाशच्या प्रेमळ शब्दांतून गर्भित असणारा उपहास तिला मुळीच सहन झाला नाही. अग्नींत प्रवेश करीत असलेल्या सतीच्या निश्चयाने तिने सारें दाबलें. दृष्टि अंतर्मुख करून ती आपल्याशींच म्हणाली—

“ जीवन–सूक्त लिहायला रक्ताचीच शाई वापरतात... हो असंच— ”

“ पण तुला हें वाक्य आवडलं, तें केवळ त्याला literary value आहे म्हणूनच ना ! ”

ती कांहींच बोलली नाही. थोडा वेळपर्यंत तिच्या पापण्यांची उघडझाप चालली होती. तिने एक दीर्घ निःश्वास टाकला आणि कपाळावरची आठी नाहीशी केली.

“ अवि, आज मी तुला एक पत्र देणार आहें वाचायला. आता तुला वाचायला कांहीच हरकत नाही. माझ्या टेबलांतिल डाव्या खणांत एक पाकिट आहे मोठं. तें आण इकडे माझ्याकडे. ”

अविनाश चटकन् उठून तिकडे गेला.

× × ×

वाचतांना अविनाश अडखळत असे. अक्षर घाईने आणि क्षुब्ध मनःस्थितीने लिहिल्यासारखें स्पष्ट दिसत होतें. तो अगदी मन लावून वाचीत होता.

मध्येच त्याने ताईकडे पाहिलें. ताई डोळे मिटून स्वस्थ झोपल्यासारखी पडली होती. मंद वारा आंत आला की, तिच्या पापण्या किंचित् विकासित होत; पण पुनः ती त्या मिटून घेई. हृदयांत जागं झालेलं जगच पहात होती जणु ती! अविनाश वाचूं लागलाः—

" पावसाच्या मुसळधारांनी सारी चराचर सृष्टि सडकून निघत होती. क्षणोक्षणीं चमकणाऱ्या विजा आणि त्या एकमेकावर आपटून होणारा कडकडाट हृदयाला धक्के देत होता. आसरा सुटल्यामुळे भीतीने गांगरून जाऊन पृथ्वीने पाण्यालाच कवटाळलें व ती त्याच्याबरोबर स्वैर धावूं लागली...

" अशा प्रलयकालींही मनुष्याचे व्यवहार सुरळीत चालू होते.... राक्षसी गतीने एखाद्या चिडलेल्या नागिणीसारखी फुस्कारीत चालणारी आगगाडी निसर्गाच्या एकाहि डुरकावणीला बिचकली नाही. काळयाभोर रात्रीं ती पोटांतले निखारे बाहेर फेकीत चालली होती. डब्याच्या सर्व खिडक्या लागल्या होत्या आणि आंतल्या उतारूंनी पांघरूण अंगाशीं लपेटून गप्पा मारावयास सुरुवात केली होती ...

" सेकंडक्लासच्या एका डब्यांत दोन व्यक्ति बसल्या होत्या. एक सोळा वर्षांची तरुणी आणि दुसरा बावीसच्या घरांतला तरुण. दोघांचीही मनःस्थिति मग्न दिसत होती... पर्वत झेलावयाचा आपण निश्चय करावा, परंतु त्याखाली आपला चुराडा तर

होणार नाही ना ? अशी शंका हृदयांत डोकावून उगीच जीव व्याकुळ व्हावा, तसे त्या मुलीला झालें होते...... काचेंतून तिने बाहेर पाहिलें... बाहेरचा अंधार आणि आंतला...

" रजनी, किती भित्री आहेस तूं. माझ्या सहवासाचा तुझ्यावर... "

..." नाही रहावत मला एकटं; अजूनदेखील पहा. मी तुमच्यापुढे पदर पसरतें... माझी स्थिति काय होईल... "

..." रजनी, माझा पाय मागे ओढतेस तूं ! मी जर गेलों नाहीं, तर आज आमच्या चार वर्षांच्या प्रयत्नांवर पाणी पडेल आणि साठसत्तर लोकांच्या देहांच्या चिंधड्या होतील;... "

— " पण त्याकरिता दुसरा एखादा उपाय नाही का ? "

— " उपाय ! रजनी, एकच उपाय की, मी जाणं आणि पोलिसाची तुकडी माझ्या मागे लावून घेणं; इकडे ते गुंतले की, तिकडे आमचं काम फत्ते ! ... आज तूं अशा परिस्थितींत असतांना मी तुला मुळीच सोडून गेलों नसतों; पण करणार काय... सठ लोकांच्या प्राणापेक्षा माझे प्राण तुला जास्त मोलाचे खात्रीने नव्हत ...... किती धीर सोडतेस तूं ! किती मौज आहे असल्या मरणांत ! येऊं दे लांडग्याची तुकडी. बहेरचा खवळलेला निसर्ग समोर आणि मागोमाग लागलेला लांडग्यांचा कळप... धडाडी दाखवावयास याच्यासारखी सुवर्ण-संधि येणार नाही. "

" पण तुम्ही गेल्यावर...खरंच मला माझ्या जिवाची भीति नव्हती, पण त्या अर्भकाचं ... मी काय करूं ? "

" रजनी, तुला माझं कार्य पुढे करायचं आहे. चळवळी-ला पैसा पुरवायला तुझ्याशिवाय कुणी नाही. "

" तें मी करीन; पण ... उद्या ... हा मुलगा जन्माला आला की, माझी दशा काय होईल ? तुम्ही राजरोस लग्न केलं असतं, तर या मुलाला घेऊन मी जन्मभर राहिलें असतें. "

" खरं आहे तुझं म्हणणं ! पण लग्नाला तरी अवधी मिळाला का आपल्याला ! काय दैवाचे खेळ आहेत ! एक महिना सुटका झाली... "

" पण अजूनही अवकाश आहे. पुढच्या स्टेशनवर उतरून आपण लग्न... "

" छे, छे, या इथे मृत्यूच्या मांडीवर लग्न करण्याइतका मी शहाणा नाही... माझ्या आयुष्यांत तुझ्याशीं विवाह करण्या-चंच कर्तव्य नाही मला... आणि तुलाही समाजांत एवढीच खळबळ उडवायची नाही... उद्या फासे उलटे पडून मी जगां-तून कायमचा नाहीसा झालों, तर माझी आठवण करीत जन्मभर रडशील तूं! लोक चार दिवस तुला मोठी धीराची अन् ध्येयाची म्हणून तुझी स्तुति करतील; पण भोग तुलाच भोगावा लागेल जन्माचा. मग तुझं कर्तव्य फक्त रडण्याचं... "

" मग आज हा मुलगा जन्माला आला तर लोक नांवे— "

" लोकांना नांवं ठेवायला संधि द्याच कशाला ? माझ्याशी आता लग्न करून तुला चांगलं राहतां येईल, असं तुला वाटतं, तें चूक आहे. माझी पत्नी म्हणून जन्मभर तुझ्या मागावर पोलीस रहातील आणि मग तुझी प्रत्येक हालचाल ते टिपून ठेवतील... तुझे पैसे कुठे जातात ... रजनी ! त्या मुलाचं काय घेऊन बसली आहेस ! रस्त्यांत आडवी येणारी धोंड आहे. जन्मल्या-बरोबर कापून काढ त्याला... भलत्या वेळीं भाववश होऊन चालणार नाही... "

" कापून ? ... " रजनीच्या अंगावर शहारे उठले.

" तुला कल्पना नाही. तें मूल जिवंत राहिलं, तर लोकांना तेवढाच बोलावयाला विषय मिळेल. आपल्याबद्दल विचार करतांना ते या दृष्टीने विचार करतील, स्त्रीपुरुषसंबंधावर व सुधारणेवर बेजबाबदार व्याख्यानें झोडतील आणि वर्तमानपत्रां-तून मारे ' खळबळ उडवून देणारा प्रश्न ' म्हणून त्याची चर्चा सुरू होईल. कावळयाला जखमच दिसावयाचा अवकाश. लोकांचें लक्ष्य मी भलत्याच दिशेने वेधूं इच्छीत नाहीं. आपल्या कार्याच्या दुसऱ्या बाजू त्यांना दिसल्या पाहिजेत. माझ्या कार्याविषयीं अविश्वासाची कल्पनादेखील मला सहन होत नाही. आपल्या जीवनाचें सर्वच धागेदोरे लोकांना दाखविण्यांत काय अर्थ आहे ... "

## यौवन

... रजनीने सर्व गोष्टींचा विचार केला ... पण मूल कापून काढण्याची कल्पना ! त्या वाक्याची दाहकता तिला कितीतरी वेळ जाणवली. तिने त्या तरुणाकडे एक वार पाहिलें. अलौकिक बुद्धिमंताच्या आयुष्याची गुंफण किती एकेरी असते, याचा तिला अनुभव आला; पण म्हणून त्याच्याबद्दलचा तिचा आदर मुळीच कमी झाला नाही. प्राप्त परिस्थितींत तो सांगतो, त्याच्याशिवाय दुसरा उपाय नव्हता ... नीति ... अनीति ... पण आपण वाईट केलें आहे, असें रजनीला स्वतःला स्वप्नांतही वाटत नव्हतें. तेव्हा प्रश्नच नव्हता ... मग त्याला उगीच मागे खेचणारे विचार सांगा कशाला ? ... ती इतर गोष्टी बोलूं लागली ... लवकरच त्यांचा हास्यविनोद सुरु झाला. ...

" पुढे काय करावयाचें, कोणत्या दिशेने कार्याला हात घालावयाचा, यांसंबधीची माहिती रजनीने लिहून घेतली. आगगाडी भर् जंगलांतून जात होती. कोणतेंसें स्टेशन आले. त्या ठिकाणीं × × × उतरून पडला. त्या भीषण वादळांत आणि पावसांत त्याने तिचा निरोप घेतला. अंधाराच्या भक्ष्य-स्थानीं पडणाऱ्या त्याला ... ... रजनीच्या हृदयाने ठाव सोडला ... परंतु तिच्या डोळ्यांत आसवें नव्हतीं ! "

" आपण जें केलें, तें कां केलें, हें रजनीला कळत होतें. त्यांत अनिष्ट जरी कांही नसलें, तरी केलेल्याचे परिणाम भोगणें भाग होतें. पित्याच्या वात्सल्याचा ओघ अविरतपणें तिच्याकडेच

वहात होता; परंतु ही गोष्ट ... ! आईचा जिव्हाळा फार तर पाझरेल. तथापि यातून मोकळें होण्याचा मार्ग ?

" तिने आपल्या पित्याला सर्व गोष्टी स्पष्टपणे सांगून टाकल्या. तिने एक लांबलचक पत्रच लिहून दिलें होतें. वत्सल पिता तिच्या पाठीवरून हात फिरवीत म्हणाला — " रजनी ! सर्व गोष्टीकडे माझं पूर्वीपासूनच लक्ष्य होतं; परंतु विसूचं नि तुझं लग्न व्हावयाचें निश्चित असल्यामुळे मी... '

" आता ती गोष्ट पुढील जन्मीं ! ' रजनीचें मस्तक पित्याच्या बाहूवर विसावलें होतें. घाबरलेल्या हरिणीच्या अवस्थेची त्यांना आठवण होत होती.

" तिचे वडील तिला म्हणाले — ' विसूनं सांगितलेल्या उपायाशिवाय त्याला दुसरा उपाय नाही.'

" बाबा, जन्मतांच मुलाचा प्राण घेऊं ? " हें वाक्य उच्चारतांना रजनीची जी अवस्था झाली होती, ती पाहून पित्यालाही गहिवरलें. त्याने आपला आवाज दाबून हळूच म्हटलें — ' जा, बेटा ! ' तुझ्या हिताचंच करीन ! काळजी करूं नकोस. माझ्यावर विश्वास ठेव ! '

" जें घडलें आणि जें घडावयाचें आहे, त्या दोन्ही घटना तिच्या डोळ्यांसमोर चित्रित झाल्या की, ती भ्रांतचित्त होऊन जात असे. ती म्हणे— ' मी स्वप्नांत तर नाहीं ना ? ' परवाच्या भयंकर वादळाची तिला आठवण होतांच त्यांत गडप

झालेल्या जिवाच्या भवितव्याचा विचार तिला सोडून यावा लागे. पुढच्या अज्ञाताची कल्पना आल्यावर त्यांत क्षणभर चमकून लुप्त होणाऱ्या ठिणगीची जाणीव तिला असह्य होई. तिला वाटे ' हीच ती अबला, जी जागी होवूं पहात आहे. ' त्यांतल्या त्यांत एकच सुख होते. ज्याच्यासाठी आपण हें सोसणार, तो ढगासारखा स्निग्ध गंभीर होता.

जीवनांतील छायाप्रकाश ती डोळे मिटून पहात होती... "

हें सर्व वाचत असतांना अविनाशला कसलीतरी शंका आली. त्याने आपल्या बहिणीकडे पाहिलें. तिचे डोळे शांत, शून्य असे त्याला दिसले. तो पुढे वाचूं लागला:—

" मातेचा जिव्हाळा म्हणजे काय, याची कल्पना रजनीला आता आली. पित्याबद्दलहि तिचे सद्भाव वाढावयाचे होते..."

मधलीं बरींच अक्षरें अविनाशाला नीटशीं निघेनात. तीं मनाच्या विलक्षण चंचल, आवेगपूर्ण स्थितींत लिहिलीं गेली असावींत. हकीगतींतील तृतीयपुरुषी सर्वनाम आता प्रथमपुरुषी झालें होतें, त्यामुळे स्वतःच्या भगिनीबद्दलचा त्याच्या मनांतला संशयाचा दोरा जास्तीच पिळला गेला. वरवरून शांततेचा आव आणून तो वाचूं लागला:—

" आम्ही काश्मिरला गेलों, आईची प्रकृति एकाएकी बिघडल्याचें निमित्त झालें. डॉक्टरांनी दीड वर्षाची विश्रांति सुचविली होती. अर्थात् तिकडे दीड वर्ष रहावयाचें. बाबा, आई आणि

मी — आमची तयारी झाली. अण्णा, भाऊ वगैरेंना सुट्टी नव्हती व त्यांना बरोबर घेण्याचें कारण नव्हते. ''

या वेळीं तर कितीतरी वाक्यें निघत ना. अविनाशची दृष्टि वर ताईकडे गेली, तों त्याला दिसून आलें की, तिच्या डोळ्यांच्या टपोऱ्या झाकणांतून आसवें झिरपत होतीं.

'' ताई '' परंतु अविनाशच्या या हाकेला ओ मिळाली नाही '' वाचून झाल्यावर बोल माझ्याशीं. '' येवढें उत्तर मिळाले. त्याची दृष्टि अक्षरावरून फिरूं लागली. त्याच्या दोन्ही वडील भावांचीं नांवें त्यांतील नांवाशी जुळत होतीं. त्याच्या बहिणीचे नांव रजनीच, याबद्दल त्याला आता संशय उरला नाही.

'' लवकरच बाबांनी अण्णांना एक पत्र धाडलें. त्यांत लिहिलें होते, आईला मुलगा झाला. माझी स्थिति विलक्षण झाली. असले मातापिता मला माझ्या जन्मजन्मांतरीच्या पुण्याईनेच लाभले होते. देवाचा विचार त्याच दिवशी माझ्या मनांत आला. आमच्या हातून जे कांही घडलें त्यांत ... पण देवावरच्या श्रद्धेची माझी विवशता माझ्या विश्वासला मुळीच रुचली नसती !

'' दोन महिन्यांत ते अर्भक आकारावर आलें. माझा व त्याचा तोंडवळा अगदी सारखा होता. ...

'' परंतु बहिणभाऊ नाही कां एकाच वाणावर जात?

त्याला माझा भाऊ म्हणून ओळखायला इतरांना मुळीच पंचाईत पडली नाही. ! ' आई — बाबा — ' हे शब्द उच्चारतांना अगदी जीव भरून येतो माझा !

" तत्कालीन पत्रांतून सारख्या बातम्या उफाळत. विश्वास रानडेला पकडावयास १०००० चें बक्षीस लावलें होतें; परंतु अजूनही कुणाला पत्ता लागला नाही. आज या गोष्टीला १६ वर्षे झालीं. विश्वासच्या कामाकरिता आजवर बाबांनी कितीतरी पैसे खर्च केले.

" खंबीर मनाची, मोठ्या निश्चयाची व एक सुशील कुमारिका म्हणून जग माझ्याकडे पाहतें. त्याला तसें पाहूं देण्यांतच माझें यश आहे. विश्वासचें वाक्य मला वारंवार आठवतें.

" अनावश्यक, व्यर्थ गोष्टींकडे समाजाचें लक्ष्य केंद्रित करण्यांत काय अर्थ ? त्या गोष्टीने इष्ट कार्य मुळीच तडीला लागत नाही. " कसें सोन्यासारखें वाक्य आहे हें ? असल्या गोष्टीचा कुणाला तोल असतो का ?

" आज आमचा अविनाश ... "

अविनाशने यापुढे मुळीच वाचले नाही.

" ताई, विश्वास रानड्यांचा मी मुलगा आहें ? " हा प्रश्न विचारतांना त्याच्या चेहऱ्यावर हर्ष, खेद, विषाद, चांचल्य यांपैकी कसलेहि भाव उमटले नव्हते. उभयतांची दृष्टादृष्ट होतांच हवें असलेलें उत्तर त्याला मिळालें.

## एक अनावश्यक गोष्ट

“ ताई ? तूं कोण ? कशी ? कशाची बनली आहेस ? ’

“ म्हणूनच अवि, तुला विनवितें रे की, मला सोडून तूं दूर जाऊं नकोस. तुझ्या रक्ताची मला फार भीति वाटते. माझं मन कसं थरथरतं. मला कांहीहि म्हण अवि, पण जाऊं नकोस. ”

परस्परांनी आपलें नवें रूप परस्परांच्या अश्रूंतून पाहून निरखून घेतलें !

जगांतल्या असंख्य माणसांपैकी एकाचेंहि या ‘ अनावश्यक ’ गोष्टीकडे लक्ष्य नव्हतें !

२३-९-१९३५

— ५ —

# नवी बायको

ती गोष्ट जशी घडली, तशीच मी सांगणार आहें. त्यावर भाष्य करणार नाहीं. ती मला कुणी सांगितली, हें आता नीटसें आठवत नाही. ज्यांनी मला सांगितली, ते गृहस्थ मोठे मनोवेधक कथाकर असावे, हें निश्चित—कारण त्यांनी तें जसें सांगितलें तसेंच माझ्या मनावर अजून या घडीला ठसलेलें आहे. ती गोष्ट अशी:—

कुठल्याशा प्रांतांतला एक माणूस होता. तो प्रांत तुमच्या आसपासच आहे. गोष्ट वाचल्यानंतर तुम्हांला असेंहि वाटेल कदाचित् की, " अरे, ही आपल्या गावची तर नव्हे गोष्ट ? कारण परवा आपला जानबा पाटील असेंच म्हणाला होता. " कांहींना वाटेल, " दिली एक थाप झोकून– अखेर तर लघुकथा-लेखक ! " या दोन मतांपेक्षा तिसरें मत निघायचें नाही; कारण जीवनाकडे पाहण्याच्या सध्या तरी या दोनच वृत्ति आहेत.

हो, तर एक माणूस होता. वय त्याचें पन्नास वर्षांचें होतें. पांढऱ्या गंधाचा चांगला भलामोठा टिळा कपाळीं लावत असे,

## नवी बायको

रुद्राक्षाची माळ होती गळयांत, पंढरीचा वारकरी आणि गावचा प्रतिष्ठित माणूस म्हणून इतर गावचे लोक त्याला चांगले ओळखत होते. तो कुठे गेला की, लोक त्याला उठून समोर येत. घोंगडी टाकून मोठ्या आदराने बसवीत. विडा सुपारी देत. असें समजत, हा माणूस आला, हें फार चांगलं झालं !

तो देखील दुसऱ्याचें भलें करणारा होता. तुळशीला पाणी, गाईला चारा, मुंगीला साखर, भिकाऱ्याला तुकडा आणि गावकऱ्याला प्रेम, इतक्या देणग्या तो नेहमी देत असे. संस्थेला देणगी मात्र त्याला द्यावी लागली नाही, कारण त्याच्या आसपास संस्था नव्हत्या आणि त्या संस्थांना देण्याइतके त्याच्याजवळ पैसे शिल्लक नव्हते; कारण त्याने कुठून तरी माती खणून घरचा उंबरठा केला नव्हता. शहरी भाषेच्या शब्दकोशांत त्याचे वर्णन ' गरीब, भोळा, सालस, खेडवळ '— असे केले जात होतें. लोक म्हणतात, ' खेडवळ ' म्हणजे न सुधारलेला ! सुधारलेला म्हणजे काय, असें कुणाला विचारलें, तर सांगतां येणार नाही, हीच फक्त उणीव. बाकी कांही नाही.

त्या माणसाला एक मोठी हुशार, कामसू आणि निरोगी अशी पत्नी लाभली होती. तिच्यापासून त्याला सुख मिळालें होतें, मुलें मिळालीं होतीं. काम मिळालें होतें ! दोन शेतांचा कारभार ती सहज सांभाळीत असे. घरचा भाकरतुकडा, पोरांचीं दुखणीं–खुपणीं, गाईचा गोठा— सारीं कामें तिचीं होतीं !

म्हणजे त्याच्या दृष्टीने त्याच्या वैवाहिक जीवनांत कसलीच उणीव नव्हती. असायचें कारण नव्हतें. सर्व गोष्टी ठीक होत्या.

परंतु त्या सुशील माणसाने अगदी एक वर्षापूर्वी म्हणजे तो एकूणपन्नास वर्षांचा असतांना दुसरें लग्न केलें होतें. तें करतांना त्याने आपल्या प्रथम पत्नीचा सल्ला घेतला होता. तिने त्या गोष्टीला मोठ्या व्यावहारिकतेने अनुमति दिली होती. मुलांना विचारलें. त्यांनी ' हो ' म्हटलें. सर्वांनी लग्नांत भाग घेतला. खीरपोळी खाल्ली. नवे कपडे घातले. गावकऱ्यांना मौज वाटली.

पुनः सर्व सुरळीत चालू झालें. तथापि एक प्रश्न होता. त्याने दुसरें लग्न केलें हा केवढा अन्याय? नव्हे का?

आणि हाच प्रश्न महत्त्वाचा म्हणून गणला गेला. जेव्हा गावच्या मालगुजाराचीं दोन्हीं मुलें डिसेंबरांत सुट्टीनिमित्त घरीं आलीं आणि त्यांना हें कळले तेव्हा! मोठा मुलगा तर फार रागावला. म्हणाला— 'त्या तरुण मुलीचा केसाने गळा कापला. या वयांत लग्न केलें, पाटाची बायको झाली म्हणून काय झालं! अजून तिची तिशी उलटली नाही आणि हा तर आता म्हातारा झाला —छे छे! आमच्या गावांत हें असं ' त्याने तें सर्व मोठ्या जोराने म्हणून दाखविलें. त्याने चारदोन पुस्तकें वाचलीं होतीं. बायबल चाळलें होतें. दया, सहानुभूति यांच्या युरोपीय व्याख्या वाचल्या होत्या. मॅकमिलन कंपनीने प्रसिद्ध केलेलें रामायण

वाचलें होतें. सीतेची आयुष्य-कथा त्याने ओल्या डोळ्यांनी आणि ओल्या हृदयाने ऐकली होती.

रघुवंशांतला कलह आणि रामाचा वनवास त्याला ठाऊक होता. स्त्रियांबद्दल त्याला फार कळवळा वाटायचा !

त्यामुळे त्याला खात्रीने वाटलें, हा मोठा अन्याय झाला !

पाटलाला काय मुलं हवीं होतीं म्हणून त्याने लग्न केलें ?

छे, त्याला होतीं की मुलं !

मग ! सुखाकरिता ?

पण तो पन्नाशीला आलेला—पहिली बाईल निरोगी, चांगली.

मग आणखी तिसऱ्या लग्नाने तो काय मिळविणार ! दोघांहि भावांनी सकाळीं उठतांच त्या माणसाचें घर गाठलें. त्याने त्यांना मोठ्या प्रेमाने खाटेवर बसाविलें. कपिलेचें दूध प्यायला दिलें. विडा दिला. सुपारी टाकली. विचारलें —' मालिक, आज सकाळींच नवं टाकलंत ते ! '

त्या दोघांना सुरुवात कशी करावी, हे सुचेना. शेवटीं मोठ्या मुलाने सुरुवात केली. त्याने येण्याचें कारण सांगितलें आणि मोठ्या आवेशाने तो म्हणाला—

' तुम्ही पंढरीला जातां. देवधर्म करतां आणि एका बाई-बापडीचा केसाने गळा कापलात, त्याचें कांही वाटत नाही तुम्हांला ? '

येवढें बोलून तो थांबला. ते पाटीलबाबाहि थोडा वेळ तसेच थांबले. कुणीच बोलेना. दारावर पोपटाचा पिंजरा होता. नुकतीच टाकलेली हरभऱ्याची डाळ तो खात होता आणि मध्येच म्हणे- ‘ लटपटपंचां चतुरकी जान, पढो प्रभाते श्री भगवान्— ’

अखेर पाटीलबाबा शांतपणें म्हणाले— “ मालक, तुमचं बोलणंच मला समजलं नाही. तुम्ही म्हणतां मला मुलं होतीं. मग लग्न कां केलं ?— मला सुख होतं तर लग्न कां केलं ! तसं कांहीच नव्हे. मी केलं, त्यांत काय झालं मोठं ? याच वर्षी मी आणखी दोन शेतें घेतलीं. तुमच्याच वडिलानी घेऊन दिलीं आणि घरच्या चार गाईपण वाढल्या. त्यांचं करावं कुणी ? हिला एकटीला तें झेपेना. मी विचार ठरविला. तिनं संमति दिली. बघा बरं कशीं पिकें उभी आहेत, शेतांत नव्या ! —तुम्हीसुद्धा खूष व्हाल—चला की. अग, —जरा पागोटं आण. ”

नव्या नवरीने पागोटें आणून दिलें. मोठ्या हर्षाने आणि समाधानाने तो उठला, ते देखील उठले !

मी आरंभीच सांगितलं आहे की, मी जशी घडली तशीच गोष्ट सांगणार. मग आता पदरचं थोडेंच लिहायचं आहे ?

१०-११-३८

—६—

# घार

सगळें विलक्षण! मला अजूनही कधीकधी वाटतें, ते स्वप्न असावें; पण तें स्वप्न नव्हे! स्वप्न आपण केव्हा म्हणतो? जेव्हा त्यांतली एखादी तरी घटना मनांत कधीतरी तरंगून जाते. तथापि तसला विचार माझ्या मनांत मुळीच कधी आला नाही व म्हणूनच तें सगळें विलक्षण!

सौ. लीला देशपांडे. वयाने बावीस वर्षांची. स्वतःबद्दल जिला कांही विशिष्ट कल्पना आहेत अशी; स्वतःकरिता जिला कांही विचार करतां येतो अशी; सुखवादी. सुखानेच राहणारी. सुरेख नव्हे; सुरूप पण नाही; पण मोहकपणा जास्त; छानच दिसायची; पति कुठे शिकायला गेला होता. ही सुशिक्षित. घरीं बसून करायचे काय? आणि म्हणूनच या कॉलेजांत आली. शिक्षणशास्त्राचा अभ्यास पुढल्या आयुष्यांत कधीतरी कामीं येईल निदान शिक्षकीण तर होतां येईल हा उद्देश! सुशिक्षित स्त्रीचें अंतिम ध्येय नोकरी, अशी आज नवी रूढि पडली आहे!

माझ्या ओळखीची; मैत्रीण मुद्दाम म्हणत नाहीं. मैत्रीण कुणाला म्हणणार ? जिच्याशी आपलें तादृश पटत नाही तिला ? जिच्या एकाही कल्पनेशीं आपली कल्पना मिळत नाही तिला ?

आणि तरी देखील मला बोलल्यावाचून राहवेना. शिवाय तिने देखील त्याला कधी मोडता घातला का ? नांव नको ! संभाषणेंदेखील तऱ्हेवाईक ! मी एकदा तिला म्हणालों, ' तूं पति निवडला, तो अगदीच हा आहे. तुला तर मुळीच शोभत नाही. ' तिने चटकन् उत्तर दिले, ' मी तो माझ्यासाठी निवडला. तुमच्यासाठी मुळीच नाही. '

तिचें म्हणणें खरें होतें ! पण एक आपली सवय म्हणून मी मत दिलें. जगांतल्या कुठल्याही घटनेवर आपलीं मतें ही असतातच !

पुनः असेंच एकदा बोलणें निघालें. तिने स्वतःसाठी साडी आणली. जोखून, पारखून. मी म्हटले, हा रंग विटेल. तिने उलट विचारलें, ' तुम्ही वापरून पाहिला का ? '

आणि हें म्हणणेंदेखील खोटें नव्हतें !

असलीं हीं भांडणें सदाचीं, रोजचीं. यांत कसलें स्वारस्य ? मी तरी का बोलावें तिच्याशीं ? हा एक प्रश्न आहे. केवळ बोलावयाचें म्हणून मी बोलत नव्हतों, येवढें मात्र खास. माझ्या सगळ्या प्रिय माणसांपासून मी दूर पडलेला. इथे माझ्या सहाध्यायांशीं बोलावें, तर त्याच त्या ठराविक गोष्टी. भांडणा-

लाही उत्कटता लागते; पण इथे नुसताच चहा व नुसत्याच गोष्टी. त्यांत मन रमलें नाही तर ? तर मग कांही नाही. शिवाय सगळे मनाचे पाश दुसरीकडे लागलेले !

पुरुष हा स्वतःला कधीतरी अपूर्ण समजून घेण्यांत सुख मानतो. स्त्री ही त्याला हवी असते, ती याचकरिता. तिच्या-वाचून त्याचें अनेक कारणास्तव अडतें– त्याच्या मनाचेंही अडतें. असें निर्बल होण्याची, असें निःष्प्रभ, रोजच्या धका-धकींत लागणाऱ्या वृत्तीपासून दूरदूर जाण्याची संधि त्याला सतत हवी असते.

ती संधि मला लीला देत आली होती का ? असेंच असेल कदाचित्. मला दुसरे कांहीच नको होतें. तिचे बुद्धिगुण, तिचे हृदयगुण, मला त्याचा काय उपयोग ? त्यांवर मालकी नव्हती सांगायची मला. ते तिने संपूर्णतया एका व्यक्तीला वाहून टाकले होते व पूर्ण सुखाचा उपभोग पण ती घेत होती. दुसऱ्याच्या बुद्धीची, हृदयांची, विभावांची तमा बाळगण्याचें तिला कांही एक कारण नव्हतें.

आणि हेच कदाचित् आमच्यांतल्या त्या सतत संघर्षाचें कारण असेल.— जें कारण माझ्या पथ्यावर पडलें— जें कारण माझ्या बुद्धीला निःष्प्रभ करण्यांतच आपलें ध्येय मानूं लागलें. कदाचित् तिला जो मी हवा असेन, तो तिच्या बुद्धीचा निकष

म्हणूनच ! माझ्या हृदयाला तिने कधी हात घातला नाही हें खरें.

मला मात्र मनाच्या त्या दुबळ्या अवस्थेंत पुष्कळ वाटे. वाटे, हिने आपल्याशीं चांगलें बोलावें. चांगलें वागावे. चार दिवसांसाठी आपली ही विद्यार्थिदशा. तेवढ्यांत संबंध वाईट व्हायला नकोत, पूर्वीची ओळख पुसायला नको. असे झालें तर चांगलें, तसें झालें तर वाईट. पुष्कळ, पुष्कळ विचार येत.

खरेंच, तसें झालें असतें तर काय झाले असते कुणास ठाऊक !

या आणि असल्याच संबंधापासून संशयाचें, संघर्षाचें बीज माझ्या मनांत सतत रुजल्यामुळे लीलेबद्दल मला आपलेपणा आणि भीति वाटत होती. ज्याच्याकडून आपण स्वतःला मुद्दाम भिववून घेतों, त्यांची देखील पुढेपुढे भीति वाटते आपल्याला. माझे एक शिकारी मित्र अजूनही उंदीर व बेडूक यांना भितात !

तात्पर्य; अशी ही सौ० लीला देशपांडे आणि असा हा मी !

आता तें स्वप्न की कायसेंसें मी वर म्हटलें तें सांगतों.

अर्थात् अशी ही बाई अवचित् माझ्या खोलींत एक दिवस सायंकाळीं पांच वाजतां व्यवस्थित पोषाख करून आंत आलेली पाहून माझ्या आश्चर्यास पारावार राहिला नाही. माझे ते घरेलू

कपडे, तो सगळा अव्यवस्थितपणा. पण त्याकडे माझें लक्ष्य होतं कुठे ? मी नुसताच पहात राहिलों.

"माझे कपडे व्यवस्थित आहेत; दिसतात ?" चेहरा प्रसन्न; प्रश्नाच्या आवाजांत खेळकरपणा. मी त्याबद्दलच विचार करीत राहिलों.

" मी म्हणाले, माझे कपडे व्यवस्थित आहेत. "

" बरं, मग ? "

" असले कपडे माणसें कधी घालतात ? "

" दुसऱ्याच्या खोलीवर छापा घालायला "

" कोटी करण्याइतका माझा प्रश्न पाचकळ नाही. मी फिरायला जायला आलें आहें. आपण जाऊं या. बरंच लांब जाऊं, का ? खूप फिरावसं वाटतंय्. "

हें सगळें– इथवर ठीक आलें. पण आता मला कपडे बदलायचे होते. ते इथे कसे बदलणार ? खोली ब्रम्हचाऱ्याची. आडोशाला कांही नाही. दुसऱ्याच्या खोलींत जाऊन बदलविले तर त्याला यायचें कारण सांगावे लागेल, आणि त्यानेच फिरायला येतों म्हटलें तर ... ?

" करा ना कपडे. "

" पण ... "

" पण काय ? मी इथे दारांत उभी राहतें बाहेर पहात– चटकन् करा पाहूं कपडे. "

हा निःसंकोचपणा— हें सगळें काय प्रकरण आहे, हे माझ्या ध्यानांत येईना. मला माझेपण राहिलेच नाही. कपडे कोणते घालावे ?

" हं, झाले का कपडे. पाहूं मी ? "

शेवटीं एक लांब सदरा, पायजामा– म्हणजे होते तेच कपडे, व तयारी झाली. आम्ही बाहेर पडलों.

" हा इथला ' मार्बल हॉल ' छान दिसतो नाही ? "

वर किंचित् उजव्या कडेला सरकलेली शुक्राची तेजोधवल चांदणी त्या संगमरवरी महालावर तेजाचा शिडकाव करीत होती; त्यामुळे त्याला खरेंच शोभा आली होती.

" या मोटारी फार वाईट. किती धूळ जाते नाका-तोंडांत ? "

कबूल. काय प्रत्युत्तर देणार ? पुढे पाहणें.

" या इथल्या इमारती म्हणे राजा गोकुळदासच्या: वार्षिक एक रुपया भाड्याने सरकारने वापरायला घेतल्या आहेत. "

या माहितीतदेखील कांहीं चूक नव्हते, मग उगीच कशाला मोडता घाला ?

" आज काय मौनाचा दिवस आहे गांधीबावा आपला ? "

" छे, छे. "

" मग आम्हां पामरांशी बोलायला काय घ्याल ? "

मला भीति पडली. वाटलें, आता आम्हां दोघांचे मूळ स्वभाव जागे होणार. जे टळावे म्हणून मी बोलण्याचे टाळत होतों, तेच नेमके !

" मग ? एका शब्दाला किमत किती ? "

" छट्, असं काय बोलतां ? "

" मग कसं बोलूं सांगा.— आपण फिरायला जातों आहोंत. उल्हास वाटायला हवा. शिवाय मी मुद्दाम नाही का आले ? "

आता खात्री झाली. भांडण व्हायचा संभव नाही. बोलायला कांहीएक हरकत नाही. बोलावे काय, याचा मी अंमळ विचार करूं लागलों; पण—

पण पाणी प्यायला उतरलेल्या प्रवाशाकरिता आगगाडी थांबत नसते !

" एक गोष्ट सांगूं ? "

" अवश्य; पण असं काय विचारतां ? "

" नाही. तुम्हांला आवडेल म्हणून सांगते. "

" सांगा. "

" मी आज सकाळीं उठलें. अगदी पहाटें तुमची ती आवडती चांदणी पाहिली. अगदी तुम्ही सांगतां तसं वाटतं नाही आपल्याला ? मला भास झाला टपोरीं टपोरीं फुलं कुठूनतरी पडताहेत— अगदी जवळशी— तोडून घ्यावीत जशीं. "

तिची ती तन्मयता ! तिच्याइतकाच मला आनंद झाला. आपला हव्यास कुणी उचललां, तर आनंद दुणावतो.

" तुम्ही कांही बोललां नाहीत ? "

" काय बोलायचं ? "

" मग बोलूंच नाही आपण— "

" छे, असं नको. "

" आणखी एक गोष्ट सांगूं ? "

" सांगा. आज पुष्कळच गोष्टी सांगण्यासारख्या दिसतात. "

" बरं, नाही सांगत. "

हा खोटा रुसवा. हा अकारण लोभ. ही विलक्षण वृत्ति. ही हुरहूर. उतावीळ ! मला याचा अर्थ कळेना. आम्ही परत यायला वळलों होतों.

" सांगा ना ती आणखी दुसरी गोष्ट. "

" माझे कपडे पाहिलेत आज तुम्ही ? "

" त्यांत कांही विशेष आहे ? "

" अहं. मी नाही सांगत. "

" अरे, हे सगळे हिंदुस्थानमां बनेलो ..."

" अगदी तेंच. मला वाटलं माझी रोजचीं पातळं वापरली, तर तुम्हांला दुजल्यासारखं होईल; संकोच होईल— जसा नेहमी होतो व मग तुम्हांला बोलतां यायचं नाही. कदा-

चिन् तुम्ही आलाही नसता माझ्याबरोबर आज. नाही ? ”

“ छे, पण तुम्ही कशाला हे कपडे घातले ? ”

“ का ? बरं वाटलं नाही तुम्हांला ? मी ते वापरायच्या...”

“ मुळीच नाही. माझं समाधान मला व्यक्त करतां येत नाही. हे मनाचं समाधान. हे दाखवायचं कसं ? मन उघडतां येत नाही. मी कृतज्ञता दर्शविली तर ?— तसं करूं ? ”

“ नाही. ”

“ ह्मणजे ? ”

“ म्हणजे मला ती नको आहे. ”

“ याचा अर्थ ? ”

“ याचा अर्थ सरळ आहे. तुम्हांला कृतज्ञता वाटली. ती मला नको आहे. तुम्हांला आनंद झाला कां ? मला तो हवा आहे. तुम्हांला आज बरं वाटावं, आनंद वाटावा म्हणून...”

“ आनंद ? मला ? ”

अगदी न कळत मला फुलल्यासारखें वाटलें. कां तें कळेना. कसें ते समजेना. माझ्या आनंदासाठी ही लीला देशपांडे धडपडते ? सौ. लीला प्रयत्न करते ??

कॉलेज जवळ आलें होतें. दिवे दिसूं लागले. रस्ता शांत होता. धूळ कमी झाली होती. जाणारे लोक जड पावलांनी जात होते. पाखरें निजून गेलीं होतीं. पाकोळ्या फडफडत, चिलबिल करीत, भराभरा इकडून तिकडे भराऱ्या मारीत होत्या. छोटे छोटे

दिवे रस्त्यावर गस्त घालीत होते. निराशेने दडपलेल्या लोकांना त्यांचाच आसरा वाटे !

आता चटकन् कॉलेज येईल व ही हुरहूर अशीच राहील. तें झाड आलें. इथून आता रस्ते वेगळे होतील आमचे. मला राहवेना.

" एक प्रश्न विचारूं ? "

" हो. आज अगदी माझं अनुकरण चालवलं आहे ते. "

" तसं नाही. पण मघाशी तुम्ही म्हणाला, माझा आनंद... माझ्या आनंदाची तुम्हांला पर्वा असण्याचें कारण ? "

" तें तुम्हांला कळायचं नाही. "

" कळेल, सांगा. "

" सगळा विरस होईल तुमचा. "

" सांगितलं नाही तरी आता होईलच. "

ती शांतपणें उभी होती. आजूबाजूला पसरलेला अंधार बरा वाटला नाही. एखादे स्वप्न नजरेसमोर तरळावे व विलीन व्हावें;— धुक्याचे विरल आवरण देखतां डोळां हळूहळू बाजूला सरावे आणि डोळयावर कसलेतरी पडदे हलकेंच पडून श्वास मंद मंद व्हावा.

असे उभे राहतांना मला प्रशस्त वाटले नाही !!

" मग, सांगा ना. "

" मुळीच नाही. मी आज मनापासून प्रयत्न केला आहे तुम्हांला खेळकर करण्याचा एरव्ही माझा स्वभाव तुम्हाला माहीत आहे. मी कशी आहे, याची तुम्हांला चांगली कल्पना आहे. आज मला कसं विचित्र वाटत होतं— अजून वाटतंय. माझं मन देखील स्वस्थ नाही. आता इथून हॉस्टेलध्येही मला परत जावसं वाटत नाही— तिथं तरी काय ... "

आज नाही म्हणतां म्हणतां ती तशीच बोलत राहिली.

... " आज त्यांच्या पत्राचा अखेरचा दिवस होता. काल-पासून मी वाट पाहते. तें पत्र ! ते वाचायला देखील मी माझ्या मनाची तयारी करीत असतें. पुरुषाच्या सहवासाची कशी भुरळ पडते— तो दर्प किती हवासा वाटतो, याची तुम्हांला जाणीव नसेल, मला, आम्हां स्त्रियांना ते कळतें. त्यांचे पत्र यायचा दिवस, त्यांचा तो अमूर्त सहवास— माझं मन अगदी आसावतं आणि कालपासून तें पत्र आलं नाही. माझे सगळे प्रयत्न फुकट गेले. मनच स्वस्थ होईना. शेवटी— आणि म्हणून माझ्या मैत्रिणी आज मला नकोशा झाल्या. शिवाय मला माझी जबाबदारी होती. म्हणून तुमच्याबरोबर मी आले— तुमच्यावर माझा विश्वास होता. तेंच कारण— तुम्ही बोलावे... "

अर्धे सोडलेलें वाक्यसुद्धा तिने पूर्ण केले नाही. जशी ती बोलायला लागली, तशीच ती थांबली; पण अवचित व भराभर पावलें टाकीत चालत गेली. तिला पुढे सांगावयाचें नसेल,

सांगावेंसे वाटलें नसेल, कदाचित् जे सांगितले, ते देखील एका दुबळ्या ...

पण ती चटकन् परतली !!

" आणखी एक गोष्ट सांगायला आले आहे. हे पूर्णपणे विसरून जा. यावरून कांही आडाखे बांधूं नका. तुम्ही थोडे फाजील हळवे आहांत, म्हणून मुद्दाम सांगतें. यांत कांही विशेष नाही– अधर्म नाही– दोष नाही. उद्या त्यांचं पत्र नक्की येईल– मी देखील त्यांना तितकंच चांगलं लिहीन– जा. जा, सगळं कांही विसरून स्वस्थ झोपा. "

माझ्या जाण्याची वाट न पाहतांच ती जशी आली, तशीच झपाझप परत जाऊं लागली. तें पांढरें शुभ्र पातळ अंधारांत दूर दूर सरकूं लागलें. पाण्यांत सोडलेला सायंकाळचा पुष्पदीप तरंगावर हेलावत पुढे जावा तसें ...

मी तसाच पहात राहिलों. काय झालें होतें ? आकाशांत दूर दूर अधांतरी उडत राहणाऱ्या घारीने भक्ष्याच्या लालचेने झडप घालावी व मिळेल तो लचका तोडून पुनः तितकेंच उंच, तितकेंच अंतराळीं उडून आकाशाचा ठाव घ्यावा—

आणि आपण आपलें काय हरवलें म्हणून पहात राहावें.

—नुसतेच पहात रहावें !

ता. ६–२–४०

—७—

# गंगास्नान

त्या टापूंत पटवर्धनांचें नांव घ्यायला एक तास लागत असे. त्यांचा तो विस्तीर्ण वाडा, त्या अश्वशाळा, तीं शिलारें, धार्मिक विधींचा एकंदर थाट, देवांचा देव्हारा—गावांतल्या लोकांना डोळे दिपवून घ्यायला मोठेंच साधन होतें तें एक !

जिला नोकरचाकर राणीसरकार म्हणून हाक मारीत, अशी एक गतधवा दुपारीं दोनच्या सुमारास आपल्या आवडत्या झोपाळ्यावर बसली होती. त्या चांदीच्या झोपाळ्यावर मखमली-च्या गाद्या टाकल्या होत्या व रत्नखचित उपधानें अस्ताव्यस्त पडलीं होतीं. झोपाळ्याच्या रेशमी दोऱ्या येवढासा जरी झोका मिळाला, तरी कर्णमधुर सळसळ करीत असत.

ती स्वतःच आपल्या उजव्या पायाने झोका घेत होती. शेजारीं बसून दोन दासी चवऱ्या ढाळीत होत्या. तिथल्या वैभवाला सीमा नव्हती. दृष्टान्त कदाचित् अप्रस्तुत वाटेल: पण तिच्याकडे पाहिल्यावर बायकांना शिवलीलामृतांतील महानंदेची आठवण होत असे.

# यौवन

चंद्रासारखी तिची अंगकांति आणि तारकांसारखें तिचें तेज. हसण्यांत मार्दव, दृष्टींत गांभीर्य आणि एक प्रकारचा उन्माद ! अजून आयुष्याचे अर्धे दिवस जावयाचे राहिलेले. जवानी देखील अजून भरावरून न ओसरलेली !

ती एक सुंदरसें शुभ्र वस्त्र नेसली होती की, जें तिच्या सौम्य स्थूल बांध्याला शोभून दिसावें. हाताने. विणकाम चाललें होतें. डोळ्यांपुढें कसलीशीं दृश्यें सरकत होतीं.

पावसाळ्याला आरंभ झालेला. आकाशात विविध रंग मिसळूं लागले होते. निसर्गाची निर्भरता प्रतिदिन वाढत होती. सारी जीवसृष्टि आपापला आधार शोधायला निघाली होती.

मेघांचा घनगंभीर ध्वनि ! वळचणीच्या कबुतरांची मादक घुरघुर; चिमणे चिमण्या घरट्यात दडून चिवचिवत असलेलीं; भोवताली तरण्याताठ्या, हसऱ्या-खेळत्या तृप्त दासदासींचा घोळका—

तिला कसल्यातरी विचित्र संवेदना होत होत्या. म्हणूनच तिचें संथ श्वसन थांबत असे. उगीचच ती समोर दिसणाऱ्या आकाशांतील धावत्या ढगाकडे पाहूं लागे.

ती ओठांतल्या ओठांतच गुणगुणूं लागली. "काले वारिधराणाम्..." द्राक्षासारखे तिचे ओठ, कोकिळेसारखा तिचा कंठ !

बाजूच्या आरशाकडे तिनें नजर फिरविली. आपले सुंदरसे

डोळे पाहिले, शुभ्र भालप्रदेश अवलोकिला, वस्त्रावृत स्फुट कोरकांवर दृष्टि स्थिरावली.

परमेश्वराने हे सारें दिलें कुणाकरिता, हा तिच्या मनोव्यथेचा अर्थ!

पुन्हा मेघाने साद घातली. तिचा जीव भरून आला. ती आपल्या आयुष्यांतील त्या दिवसांकडे पाहूं लागली की, ज्या वेळीं ती सधवा होती, ज्या वेळीं नित्यनेमाने ती गंगेवर स्नानास जात असे आणि ज्या वेळीं पाण्यांत तासन् तास उभी राहून, भरलेल्या ढगांकरवी मदनाला निरोप पाठवीत असे.

गंगास्नानाची आठवण! तिचे मन बहरलें. त्या वेळीं तोच तिचा एकुलता एक मनोविलास होता. गंगालहरींच्या सतारीची छेड, हेच तिचे मनोविनोदन! तारुण्याचे सारे खेळ ती गंगेबरोबरच खेळलेली होती.

मंदमंद पावलांनी ती वाळवंटांत चालावयाची. तिच्या पायाने दबलेले वालुकाकण आपल्याला धन्य धन्य मानून घेत असत. गंगेच्या पाण्यांत पाय घातला की, तिचे अंग शहारून येई. पतीच्या पहिल्या स्पर्शानेही तिला कधी तसें वाटले नव्हतें. हळू-हळू ती पाण्यांत उतरत असे. एक एक पाऊल पुढेपुढे न्यावयाचें, छातीपर्यंत पाणी आले की, पदर पाडून घाटावरची मौज पहायची. घरच्या खानदानीतून मोकळेपणा मिळवायला तिला तेवढीच जागा होती.

## यौवन

पायाखालची वाळू हळूच सरकायला लागली की, तिला गुदगुल्या होत. उरोभागीं लाटा हेलकावे खाऊं लागल्या की, ती त्या लहरींचें चुंबन घेत सुटे. आपले कोमल हात मृदु मृदु तरंगावरून फिरवितांना तिची "सूध" नाहीशी होऊन जाई.

गंगेची मरुस्थली स्नान करणाऱ्यांनी नेहमीच भरलेली असे. तिच्याच शेजारीं थोड्या अंतरावर चार तरुण मुलगे पोहावयास येत. कित्येकदा ते पाण्यांत खूप मस्ती करीत. एकमेकांच्या अंगावर शिडकावे उडवून त्या हबक्यांनी परस्परांना आधमुसें करण्याची त्यांची शर्यत लागे. कधींकधीं ते हबके तिच्यापर्यंतहि अवचट येऊन पोचत.

तिला तेंच पहावेंसें वाटे. तिथून तिचा पायहि उचलत नसे. तीं पोरें गेल्याशिवाय पाण्यांतून निघण्याचें तिच्या जिवावर येई!

लावण्याची खाण! मदनाची शिकार झालेली! तिला लवकरच कळून आलें की, तीं पोरेंदेखील तिच्याविषयीं उदासीन नाहीत. त्यांच्याहि डोळयांत कांहीतरी आहे. त्यांच्याकडून गंगेच्या मोठ्या लाटा तिच्यापर्यंत येत. तिच्या नाजुक हाताने हलणारे पाणी त्यांच्या हृदयांपर्यंत जाऊन भिडे—

त्यांच्याकडे पाहतां पाहतां तिचेहि डोळे भुकेले होत. ओठांना दातांनी दाबून ती त्यांची थरथर थांबवीत असे.

सूर्यग्रहणाचा दिवस! गंगास्नानाची पर्वणी. सायंकाळीं ती सुद्धा स्नानास गेली. सूर्याची प्रभा लोपली होती. क्वचित् चांदण्याहि

आभाळांतून डोकावत. तिला वाटले आपल्या सुखाने त्या तिला चिडवीत आहेत.

तिने गंगेत उडी घातली. अठरा वर्षाचे वय! कुणीतरी हळूच म्हटलेलें तिला ऐकूं आलें " काम्बोज-तुरगांगना ..."

इकडेतिकडे शोधक दृष्टीने पाहतां तिला आढळलें की, ती पोरे आजदेखील तशींच खेळत आहेत. तिच्या अंगावर आज ज्यास्तच हबके नि शिडकावे येऊं लागले. प्रकाश धूसर झालेला! जीव भरून आलेला! ती निर्निमेष उभी राहिली. अधीरतेने तिचे अंग पुलकित झालें. तिचा पाय घसरला. ती वहातां वहातां ओरडली—

" धावा, धावा, मी बुडतें आहे."

त्या पोरांनी तिला अलगद उचलून पाण्यावर धरली. तिचे ते द्राक्षासारखे ओठ ...! त्यांनी तिला ओलेत्यानेच घरीं पोचविली. तिचे डोळे शांततेने विकल झालेले दिसत होते. पारिजातकाचे फूल थोडा वेळ हातीं धरल्यावर जसे होते तसें— !

घरच्या माणसांनी त्या पोरांनाच धन्यवाद दिले. ती ज्या मंचकावर निपचित पडली होती, त्याभोवती सारी मंडळी गोळा झाली. शेजारच्या आयाबाया जमल्या—

" कशी बाई, चांगलें पोहतां येत होते, कसा पाय घसरला

कोण जाणे."

त्या राजीवनेत्रेने एकदा डोळे उघडून वरील वाक्य म्हणणाऱ्या बाईकडे पाहिलें. किंचित् स्मिताची रेघ तिच्या ओठांवर उमटली. जणु तिच्या ओठांनी व डोळ्यांनीच उत्तर दिलें,—

"बाई, माझ्यासारखी तूं रोज मोतीमाणकं खात राहिली असतीस आणि तुझा नवरा माझ्या पतीसारखाच जरत्कारु व रोगी राहिला असता, तर तुझेही पाय गंगेत असेच घसरले असते !"

हीच ती आठवण—हेच तें हास्य !

राणीसरकारनी भानावर येऊन एक दीर्घ उसासा टाकला. दासदासी झोके देत चवऱ्या ढाळूं लागल्या !

२६-९-३६

—८—

# तेवढा एक तास

छे, छे! ती गोष्ट मी मनांत देखील आणतां कामा नये! माझ्या भोवताली बसलेली ही माझी तरुण मित्रमंडळी मला सारखी हिंणवीत आहे. त्यांना दुसरा विषय बोलायला नाही. तोच विषय ते तीन दिवसांपासून चिघळत आहेत. दुसरे किती तरी विषय आहेत विवाद करायला. युद्धाच्या गोष्टी मोठ्या मनोवेधक असतात म्हणे, — त्यांना त्याची क्षिति नाही. देशाच्या गोष्टी क्षोभक आणि स्फूर्तिदायक असतात; पण त्यादेखील त्यांना व्यर्थ वाटतात. ते मला परवापासून सारखे म्हणत आहेत—' तूं चूक केलीस. तुझी भीति व्यर्थ होती. असली संधि कधी येत नाही. फुकट चालून आलेली ही अमोल वेळ तूं घालविलीस. कसला भ्याड तूं! '

आणि म्हणून मला वाटतें की, माझें मन देखील तीन-तीनदा ती गोष्ट मनांत आणल्याने मला म्हणेल, ती संधि सोन्यासारखी होती. तुझ्या सर्व कामना पूर्ण झाल्या असत्या. मग ही समोरचीं ध्येयें आपोआप बाजूला सरतील, विरतील व एकच गोष्ट मला सुचेल; तो क्षण मी कां सोडला? आणि सर्वात

महत्त्वाची गोष्ट, कुणाकुणाला त्यांतले अक्षरदेखील कळलें नसतें.

हें शेवटचें वाक्यच सर्वांच्या दृष्टीने महत्त्वाचें होतें. माझे सवंगडी मला म्हणतात– " लेका, कसा रे तूं ! तुला कसलाहि प्रतिबंध झाला नसता. आम्ही जर त्या दुकानांत गेलों असतों तर... "

तर त्यांनी काय केलें असतें ? दुकानांत वस्तु विकत मिळतात. त्यांतला हवा तो जिन्नस घेतला असता. पैसे मोजले असते व घरीं आले असते. मी तेंच केलें. लोकरीत अशीच आहे. मी त्या दुकानांत गेलों. मला जी वस्तु हवी, ती विचारली व ती मला मिळाली. मला शंका होती; येवढेसें तें गाव; आता कुठे तिथे मोटारी उभ्या राहूं लागल्या होत्या, अठदहा दुकानें; मित्राच्या लग्नाकरिता कालच इथे पाय ठेवला; ओळख नाही व आजच काम पडलें. केशराचा डबा सामानांत आला नाही; उद्या मेजवानी; जिलबीचा बेत; स्वयंपाकी रात्रीं आठाला सुरुवात करणार; कोठी हुडकली; सायंकाळचे पांच वाजले. केशर सापडेना; सीताकाकूंना विचारलें; त्यांनाही आठवेना; अण्णासाहेबांनाही विचारायला कमी केलें नाही. तों काय, एकदम ते माझ्या अंगावर ओरडले. म्हणाले, " तुम्ही कसली व्यवस्था ठेवणार ! हें तुमच्या कॉलेजांत थोडेंच शिकवितात !–'सिक्रेटस्' नसशील विसरलास—इ. "

तथापि त्यांचें व्याख्यान ऐकायला वेळ कुठे होता ? व उपयोग तरी काय ? कपडे घातले. नवेच होते. लग्नाकरताच आले होतों. जें शोभेल व इतरांना चांगलें दिसेल, तेंच आणलें होतें. धोतराचा काचा मारला आणि केसांवर हात फिरवीत बाहेर पडलों.

चारपांच दुकानें धुंडाळलीं. कुठे तंबाखू कुठे गूळ कुठे शेंगदाणे ! पण केशर कुठे मिळणार ? त्या गावच्या संस्कृतीत केशराला वावच नव्हता जसा कांहीं ! सगळे दुकानदार माझ्याकडे पहायला लागले. केशर मागतो आहे हा. तो माझा कोट. ती केसांची ठेवण. अर्थात् मी कुणीतरी परका, श्रीमंत होतों.

ते एकच दुकान असें निघालें, जिथे माझ्या प्रश्नाला ‘ आहे, ’ असें उत्तर मिळालें, व एक प्रश्न विचारला गेला. ‘ कसें हवें, उंची कीं साधारण ? ’

मला विस्मय वाटला. क्षणांत मी दुकानांतल्या सर्व वस्तु पाहून टाकल्या. कांहीं फार मोठें दुकान नव्हतें तें. अगदी साधारण पण सामान पुष्कळ. पोतीं, डबे, पिपे, सगळें भरगच्च भरलेलें ! एक काचेचें कपाट, मळलेले, धुरकटलेले. त्यांत सिगारेटस्, साबण, तेल ! हें सगळें इथे खपतें ? अर्थात् हा प्रश्न मनाला होता. डोळे दुकानदाराकडे लागलेले. ती मूर्ति ! ते भिजलेले धुरकट डोळे, तें बुटकें स्थूल शरीर, पिढीजात मळकें धोतर,

उघडें बेडौल अंग, दाताची कवटी चपक्लेली; दात बरबटलेले, चष्मा व तेलकट चेहरा! दोनच वस्तू स्वच्छ होत्या; हातांतील सोन्याचें कडे व गळयांतली कंठी. कमरेचा चांदीचा ' करदोडा ' धरायचा नाही. डोळयांतून कसले निर्बल भाव दिसत होते न कळे! असें वाटे, या माणसाचा अपराध केला, तर याला सूड घ्यावासा वाटेल. त्याची खुषामत केली तर तो रागावेल. हसविलें तर डाव धरील; रडविणे शक्य नाही. भिवविलें तर भिईल, पण पुनः मनांतून दंश कायम!

पुनः त्याने तो प्रश्न विचारला— " कौनसा चाहिए? कीमती या साधारण?"

" मला दोन्हीही पाहूं द्या. "

त्याने कपाटांतून एक डबा काढला व त्यांतलें केशर दाखविलें. " हें साधारण, यापेक्षा हि चांगलें आहे, पण किमत फार पडेल. चार रुपये तोळा."

लग्नाचा प्रसंग. पैशापेक्षा बाकीच्या गोष्टी प्राह्यच्या असतात. वधूवरांपेक्षा इतरांचीच मिजास संभाळावी लागते. ऐपतीपेक्षा प्रतिष्ठेला किमत द्यावी लागते.

" मला हें नको. चांगलें हवे व पाच तोळे हवे. "

त्याला बरें वाटलें. त्याचा चेहरा निवला. मीदेखील थोडा शांत झालों. मला आता त्याच्याकडे पाहवले.

" या, बसा. " मी एका पेटीवर बसलो.

" अरे, जरा बाहर आवो. " आंतून त्याला प्रत्युत्तर मिळालें. दार उघडलें गेलें. एक वीसबावीस वर्षाची स्त्री बाहेर आली. मुलगी असेल कदाचित्–पण ही विशिष्ट आज्ञाधारकता ? बायको असेल–पण मग इतकें लहान वय ? ती आली. मला पाहतांच तिने डोक्यावरचा पदर किंचित् कपाळावर ओढला.

" बाबूको केशर चाहिए। उपरके बकसमें है! यह ताली लो। जितना उन्हे चाहिए उतना नाप दो। रुपया बजाकर लेना। मै अभी ठैर नहीं सकता। मुझे जानाही होगा। लोटा कहाँ है ? "

ती बहुधा सायंकाळच्या विधीची नोटीस असावी. तो निघून गेला. तिने माझ्याकडे पाहिलें. माझ्यासारख्याला त्या पेटीवर बसविलेलें तिला आवडलें नाही. किंचित् रोषाचे भाव तिच्या निमगोऱ्या पाणीदार चेहऱ्यावर उमटले. तिने ओठ मिटले, उघडले. सारें क्षणभरच; कारण तिला वस्तु द्यायची होती. दुकानांतल्या गिऱ्हाइकाला घरच्या भानगडींत पडूं देणें तिला पसंत नव्हतें.

" आप गद्दीपर बैठिएगा। मैं अभी लाती हूं। आपका समय बरबाद नहीं होगा। "

मी तेथेच बसून राहिलों. ती आंत गेली. ज्या दारांतून आंत गेली, तिकडे सहज मी पहात होतों. दुकान म्हणजे घरचाच भाग. मालक पैसेवाला दिसतोय; पण राहणी ... वगैरे जे रिकामपणी सुचतात, तसले विचार माझ्या मनांत आले व दुसऱ्या क्षणीं ती परत आली. जिन्याच्या पूर्ण पायऱ्या

ती चढली होती किंवा नाही देव जाणें ! किंचित् संकोचाने तिने माझ्याकडे पाहिलें.

" आपको उपर चलना होगा। बाकस यहाँ लाना मुष्किल है। मेरेसे नहीं आएगी। क्षमा कीजिएगा। "

मला तर चीडच आली. तथापि अडलेला नारायण होतो. शिवाय तिने गादीवर बसायला सांगितलें होतें. शिवाय पेटीही भारी असेल. घरवाल्याची शिस्त किल्ल्याकुलुपांची असेल व केशर नसलें, तर पुनः अण्णासाहेबांच्या शिव्या !

मी निमूटपणें उठलों. ती भराभर जिना चढून गेली. माझें काम लवकर व्हावे, म्हणून तिची ती तत्परता; तिचे वय व तिची सभ्यता. तिन्ही गोष्टी मला दिसतांच माझा राग बराच निवला होता. वर जाईपर्यंत त्याचा मागमूसहि राहिला नाही. किंमती वस्तु कडीकुलुपांत ठेवावयाच्या असतात. तिच्या सौंदर्याकडे पाहण्याची माझी मनःस्थिति नव्हती; पण तिची अपरिचित सभ्यता व सौजन्य मनांत भरले. मला थोडे निःसंकोच वाटलें. जिन्याच्या पायऱ्या चढतांना मी अस्पष्ट अशी शीळ घालून गाणेंही सुरू केलें होतें. थोडा चेहरा चढविला. शीळ घातली की, आपण रुबाबदार, बेफिकीर दिसतों, अशी आपली कल्पना असते. मी तसेंच दाखविलें. मला घाई होती. सवड नव्हती.

हो- तर ती वर आली. बसायला तिने मला एक लोखंडी खुर्ची दिली. पुनः एकदा तसदीबद्दल क्षमा मागितली. घरमालकाच्या फाजील खबरदारीबद्दल थोडासा उल्लेख केला. ' असली किमती वस्तु कुणी घेत नाही. दुकान उघडें असते, म्हणून वर ठेवावी लागते तुमच्यासारखाच एखादा ... '

तिला अचानक आठवण झाली. मला केशर हवे आहे. तिचीं पावलें पेटीकडे वळलीं. अर्थात्- " ही त्यांची रोजची वेळ. गिऱ्हाईकें याच वेळी येतात. इ० " चाललें होतें.

एक भली मोठी लाकडी पेटी. तिथे ती उभी होती. किल्ल्या हातांत—

पण ती पेटी उघडत कां नाही? आणि पाठमोरीच उभी कां? की तिला केशर कुठे ठेवलें, हें माहिती नाही? मालक येईपर्यंत ती मला अशीच झुलवणार का? आहे तरी काय? मला राहवेना.

" मुझे जलदी है। कृप करके— "

तसेच पाठमोरे उभे राहून, पण अगदी अस्वाभाविक निश्चयाने तिने चटकन् उत्तर दिलें.

" नहीं, आप बैठिये। उन्हें एक घंटा है। यह उनकी आदत है। एक घंटा वे नही आएंगे। आप बैठ सकते है। आप—"

आणि ती विजेच्या वेगाने माझ्याकडे आली!

डोक्यावरचा पदर खाली पडला होता!!

२१-१०-३९

—१—

# शरयूचीं लग्नें

' आई, ते सारे फोटो परत कर ज्यांचे त्यांचे; त्यांपैकी मी एकाही मुलीशीं लग्न करणार नाहीं. '

आपले सुंदरसे केस टोपीखालीं दाबीत, अर्धवट आरशांत पहात एक तरुण उद्गारला आणि दुसऱ्या क्षणींच धोतराचा सोगा खिशांत कोंबून त्यानें वहाणा पायांत घातल्या.

त्याची चालण्याची ऐट, डोळ्यांतील चमक, ओठांची चाळवाचाळव या सर्वांत एक प्रकारचा जिवंतपणा होता. अगदीं शिगेवर चाललेल्या डोहासारखा; परंतु आभाळीं हत्तीयेवढाले ढग आले, तरी त्यांच्या सावल्या पोटांत घ्यायची तयारी. आंत असंख्य घडामोडी चालल्या असल्या, तथापि वरच्या लहरींवरून कुणाला फारसें कांहींच कळूं नये. दुर्दम्य आत्मविश्वास साऱ्या अंगांत मुसमुसला होता.

रस्त्यानें उकडायला लागलें, म्हणून त्यानें आपल्या कोटाच्या गुंड्या सोडल्या. कसलेतरी कागद खिशांतून काढीत तो चालला होता.

तो एका घरासमोर येऊन पोचला व तेथे खेळत असलेल्या छोट्या चिमणीला त्याने विचारलें. ' काका आहेत का ग घरीं ? '

' हो, बसले आहेत. '

त्याने आंत डोकावून पाहिलें. काका सूत काढीत बसले होते. समोरच्या सुकवाशीवर एक पगडीवाले सद्गृहस्थ आणि त्यांच्या शेजारींच एक सोळा वर्षाची गोरीपान मृदुमुखी पोरगी.

तो चरकला. हें काय ? कॉंग्रेसभक्तांच्या घरीं हे केळकर कसे ? आणि केळकरांच्या राजकारणांशीं पोरींचा काय संबंध ?

आपले विचार त्याने आवरते घेतले. त्यांना सर्वांना सावध करावें, म्हणून त्याने हाक मारली—

' काका '

' कोण, विश्वास ? ये, ये, मघाशीच तुझी मला आठवण झाली. तुझें तें Sugar questioneer आजच्या डाकेने आलें. अरे, पण बैस ना ? '

तो बसला. त्याने अजूनहि त्या गृहस्थाकडे किंवा त्या मुलीकडे पाहिलें नव्हते.

' काका, Agriculture and Industries चा तो डायरेक्टर कोण आहे हो ? नांव काय त्याचं ? '

' भालजा– ' त्या पगडीवाल्यांनी उत्तर दिले.

' का ? तूं जाऊन आलास वाटतं ? '

“ हो. पण उपयोग काय ? मी त्याला चांगला सुनावला. तो म्हणतो, ‘ प्रत्येकाला बत्तीस एकरांच्या वर उसाची लागवड करतां येणार नाही. पाणीपुरवठा कमी आहे. ’ खोटें आहे हें. मी जातीनें पाहून आलों आणि वर कारण काय सांगतो, म्हणे other crops suffer. तेव्हा उसाचे मळे कसले तयार होणार सी. पी. मध्ये ! ”

“ मग तूं काय म्हणालास ? तूं त्याला शहाणपण शिकविलं असशील. तू म्हणजे काय ? ’ ‘ अरे हो, समजलें का बाबासाहेब, हा आपल्या अप्पांचा मुलगा विश्वास मराठे. मोठा बाणेदार, अगदी लाखांत एक समजा. ’

‘ असं होय ? ’

‘ आणि विश्वास, हे रा. ब. बाबासाहेब केळकर. वर्ध्याचे राहणारे. माझे बालपणचे शाळासोबती. दिवस पहा कसे असतात. हे रावबहाद्दुर झाले आणि आम्ही सर्व गमावून बसलों असें. का रे बाबा ...’

हा त्यांचा प्रश्न उत्तराकरिता नव्हता. नंतर दोघांची ओळखदेख, नमस्कार वगैरे झाले. त्या जवळच्या मुलीनें दुसरीकडे पाहिलें. तिच्या मनांत कसलेतरी दुसरेच विचार चालले असावेत.

‘ तुमचे वडील म्हणजे दिनकरराव मराठे, रजिस्ट्रार आहेत ते. नव्हे का ? ’

‘ होय ’

‘ वा, वा, आनंद झाला आपल्याला पाहून ! अनायासेच भेट झाली. मला थोडं जरा कामहि होतं आपल्याशीं. जरा एकीकडे बोलूं आपण. ’

बाबासाहेबांनी जवळ जवळ त्याला उठविलेंच.

‘ चल, ये बाळ शरयू ! ’

ते तिघेहि जरा बाजूस गेले.

‘ हं, ही आमची शरयू. वय सतरा. यंदाच कॉलेजमध्ये गेली. शरू, हे आपले विश्वासराव मराठे; ज्यांच्याबद्दल मी आज आगगाडींत बोलत होतों. ’

शरयूच्या तोंडावर ‘ असं का ’ चा भाव.

विश्वासाची मुद्रा गोंधळलेली.

शरयूने विश्वासकडे पाहिलें. त्याने तिच्याकडे.

‘ तुम्हांला माझं पत्र पोचलंच असेल. दिनकररावांनी– ’

‘ होय, बाबा म्हणत होते कांहीतरी. ’

‘ ठीक, ठीक. फार आनंद झाला. आता अनायासेंच शरयू तुम्हांला दिसली. तुम्ही सुशिक्षित. अगदी मनमोकळेपणाने बोला हं. कशी आहे आमची मुलगी ? पसंत ना ? ठीक ! ’

शरयू आणि विश्वासचे ते चेहरे !

प्रत्येकाच्यां तोंडावर संध्येची लाली. आणखी कशाकशाची, पण खूप !

‘ आपण कुठे असतां सध्या ? ’

‘ मी यू. पी. मध्ये आहें ’

‘ अस्सं ! खेळाचा वगैरे नाद ? ’

‘ टेनिसचा. ’

‘ ब्रेहो, शरू, Congratulations ! अगदी life companion घे तुला. ’

विश्वास कावराबावरा होतो !

‘ तुम्ही खादी वापरतां नव्हे का ? पोरी, थोडा त्रास होईल तुला जरा ... पण ...’

शरयू चिडल्यासारखी झाली म्हणून वरचें तिच्या वडिलांचें वाक्य अपुरेंच राहिलें. बाबासाहेबांची कल्पना ही की, आपण आपल्या घरीं बसून निवांतपणें बोलत आहोंत.

‘ तुम्ही यू. पी. मध्ये आहांत तर ! काय करितां तिकडे हल्ली ? ’

‘ मी साखरेच्या कारखान्यांत आहें.

‘ That's it ! हें तर त्याहून छान ! मग शरू, तूं खूप साखर खात जा ! अगदी साखरेसारखं जमतं विश्वासराव ! ’

त्या दोघांनी एकमेकांकडे पाहिलें. तिला काय दिसलें देव

जाणे; पण तिचा गुलाबासारखा चेहरा पांढरा फटफटीत पडला.

'मग हें लग्न ? ...'

विश्वास काकाकडे जावयास निघाला.

खरंच शरयूचें हें लग्न ?

पण तिचीं अशीं कितीतरी लग्नें रावबहाद्दुरांनी लाविलीं होतीं आजवर !

शरयूची दृष्टि पुढे जात असलेल्या विश्वासावर खिळली. त्याच्या कपाळावर मघाशी चढलेल्या आठ्या तिला आठवल्या.

तिचे डोळे डबडबले !

तिने बाबासाहेबांकडे निर्बल क्रोधाने पाहिलें.

बिचारी शरयू !

१५।९।२६

—१०—

# भाकरीची गोष्ट.

समोरच्या शेतांत जो मांडव दिसतो, त्याला ' खळें ' असे म्हणतात. उन्हाळ्यांत खेड्यांतून आगीची फार भीति असते. गरिबांच्या झोपड्या गवताच्या असतात. पेटल्या तर गाव पेटते. म्हणून शेतांतील कडबा, कुटार घरीं नेत नाहींत. सायंकाळी शेतकरी जागली येतात. चांदण्या रात्रीं त्या मोकळ्या मैदानांत मोठी मौज वाटते; परंतु ती कुणाला? तुमच्या–माझ्यासारख्यांना, जे इथे विश्रांतीसाठी येतात त्यांना!

परंतु या सर्व फालतू गोष्टी मी तुम्हांस सांगत आहे. तसें सांगावेंच लागतें. लेख किंवा व्याख्यान सुरू करतांना आरंभींची कांही वाक्यें निरर्थक आणि निःसत्त्व लिहिण्याचा प्रघात पडला आहे.

हं, थांबा! आता अगदी हळू, जपून पावलें मोजत चालावयाचें. हें पहा तें शेत आलें. ही त्याची शीव! मातीचीं ढेकळें

पायाला लागतात होय? बघा, घसरूं नका. किंचित्‌देखील आवाज होऊं देऊं नका.

कां नको? तुम्हांला कारण सांगूं? कारण एकच. तुम्ही पाहतां हें त्या दोघांना कळूं नये, ही माझी अपेक्षा. मला माहीत आहे, इथे तुम्ही हालचाल केली, स्वतःचें अस्तित्व जाणविलें, तर तुमचे नुकसान व्हायचें नाही. क्रौंच–मिथुनाचा संयोगभंग करणाऱ्या निषादाला शाप द्यायला इथे वाल्मीकि यायचा नाही.

तथापि, वैदिक धर्माच्या आज्ञेने तुम्हांला पाप लागणार नसले, तरी माणुसकीच्या धर्माने तुम्ही अपराधी ठराल आणि त्या अपराधाला प्रायश्चित्त नाही. तुमच्या हालचालीने ती दच-कली व तिचे लक्ष्य जर तुमच्यावर गेलें; स्वच्छ कपडे घात-लेल्या एका शहरी माणसाने आपल्याला अशा स्थितीत पाहिले, हे जर तिच्या लक्ष्यांत आलें तर—

ती काय करील? करणार काय? परंतु तिच्या हृदयाला एक जखम होईल. त्यांतून वाहणारा रक्ताचा पाट तुम्ही पाहिला, तर बेशुद्ध व्हाल. नका ते पाप करूं!

अरे, हें काय? तुमच्या डोळ्यांत ही सहानुभूति कुठून व कधी आली? तुम्ही माझ्याबरोबर यायला निघालांत, तेव्हा फक्त जिज्ञासा होती तुमच्या मनांत! आताच ही नवी पैदास

कशी आणली ? पूर्वजांची निष्क्रियतेची ही मिळकत घेऊन तुम्ही या शेतांत प.ऊल का घातले ? ज्याला कांही करायचें नसते, तो सहानुभूति, दया दाखवितो. छे, छे, तें सारें काढून टाका. तुमच्या सहानुभूतीची गरज नाही इथे कुणाला. एखाद्या मरतुकड्या कुत्र्याला, लुळयापांगळ्या भिकाऱ्याला किंवा देशासाठी मरणाऱ्या महाभागाला तुम्ही तीच, त्याच ठशाची सहानुभूति दाखविता व तिच्यामुळे एकही प्रश्न सुटत नाही. काढून टाका ती डोळयातून !

चला ! पुढे व्हा ! दचकूं नका असें. तुम्ही आता असें एक दृश्य पहाल की, जें तुमच्या मनाला विस्तवासारखे चटके देईल. नवखे आहांत. कच्चे दिसता. आपले डोळे स्थिर करा. तुमच्या डोळ्यांवर तुमचा विश्वास असूं द्या. फार दिवसांपासून तुम्ही ती सवय सोडली आहे, जें पहातां, तें कबूल करीत नाहीं.

तो झोपाटा दिसतोय. तो, त्या फटींतून पहा. त्याच्या आड ती आणि तो दोघेही आहेत. पांच मिनिटांत ते बाहेर येतील. तो इथेच राहतो. त्याच्या हातीं थोडी सत्ता आहे. तो इथला नोकर आहे कीं मालक, हें मीं सांगण्याचा तुमचा माझा करार नव्हता. तो सुंदर आहे की कुरूप दिसतो; तरुण दिसतो की म्हातारा आहे, हें तुमचें तुम्ही पाहून घ्या. देवाने डोळे दिले आहेत तुम्हांला.

आणि ती ? तिच्याबद्दलही तुम्हीच कल्पना करून घ्या. ती बाहेर येईल. थोडा वेळ थांबेल. कपडे नीट करील व सामान घेऊन चालती होईल. अगदी झपाझप पावलें टाकील. पक्षीण जशी एकाच भरारीत घरटे गाठते.

तुम्ही कल्पना कराल, ती तरुण असेल, सुंदर असेल, गोरी नसली तरी सतेज असेल; परंतु शहरच्या कवींनी तुमची ही केलेली फसवणूक तुमच्या कामीं पडणार नाही. तुम्ही असल्या बुरसलेल्या मवाळ कल्पना तिच्या बाबतींत करूं नका. तिला तीन मुलें आहेत. तिच्या हातापायाचीं चिपाडें झालेलीं आहेत. तरुण आहे कीं म्हातारी देव जाणे ! तुमच्या जवळून ओझरती गेली, तर तुम्हांला तिच्या अंगाची घामट घाण येईल. तिचे केस पिंजारलेले आहेत. तिच्या कपड्यांतून तुम्हांला तिचें कृश, खरुजल्यासारखें अंग दिसेल—

—जें अंग तिने दोन पायल्या ज्वारी आणि दोन कडब्याच्या पेंढ्यांच्या मोबदल्यांत, कांही वेळासाठी दुसऱ्याचे होऊं दिले आणि जें त्या खळेवाल्याने स्वीकारलें.

मी तुम्हांला आता पुढचें शक्य तितक्या मोजक्या शब्दांत सांगतो. आता ती घरी जाईल. ती पहा, ती निघालीच —जरा बाजूला व्हा—या ढिगाऱ्याच्या आड लपा. तिच्या मनांत विचार करायला आता ठिकाणच राहिले नाही. घरी गेल्याबरोबर ती

ज्वारी निवडून दळील आणि आज तीन दिवसांपासून अर्धपोटीं असलेल्या आपल्या मुलांना खाऊ घालील. तिलासुद्धा भूक लागली आहे. तीन दिवसांची ती उपाशी आहे. तुम्ही हौसेने उपवास करता. या सक्तीच्या उपवासाची तुम्हाला कसली जाणीव राहणार ?

दुसरा दिवस उजाडल्यावर ती काय करील, तिचें काय होईल, तीं मुले मरतील कीं जगतील, याचा तिनेच विचार केला नाही, तर तुम्हां–आम्हांला उगीच पुळका कां ?

तिला कांही वाटत नसेल, असें मात्र समजूं नका, परंतु तिचे वाटणें वेगळे आहे. हें पोट भरण्याकरिता, या एका भाकरी-करिता जसा अंगांतला सगळा घाम, अवघें रक्त, साऱ्या भावना, सारी नीतिमत्ता, सर्व द्यावें लागतें, त्यांतच हेंही एक ! व या सगळ्या गोष्टी दिल्यानंतर एक भाकर, ढसढसा प्यायला पाणी, लोकांना दिसावींत म्हणून वस्त्रें, व निजायला जमीन, येवढें मिळतें, हें तिला ठाऊक आहे व म्हणूनच तिची विचार करण्याची दिशा ही अशी आहे.

तिची एकटीचीच ही दशा आहे, असें नव्हे. तुम्हांला किती उदाहरणे देऊं ? हें इमारतीचे तुमच्या शहराचें बांधकाम पहा, ही संध्याच्या बाजारांतील रात्रीची पाळी पहा, डोळे–कान शाबूत ठेवा व ही भाकरीची गोष्ट ऐका !

एक काम कराल का ? घरीं गेल्याबरोबर हें सारें विसरून

जा. नाहीतर कांही नवीन पाहिलें, ऐकले, म्हणून लिहाल आणि कागद खर्च कराल. लोकांची सहानुभूति मिळवावी, म्हणून स्वतःची बुरसलेली काव्यशक्ति शिणवाल. मघाशीं तुमच्या डोळ्यांत ती भावना होती, म्हणून भीति वाटते. तुम्हांला माणुसकीची शपथ आहे.

हे पाप करण्यास सरसावलात तर तीच मघाची मरतुकडी बाई तुम्हाला कुठेतरी गाठून जबाब विचारील आणि तिच्या डोळ्यांकडे पाहूनच तुमची गाळण उडेल; परंतु—

तुमच्याकडे बघण्याचेंही त्राण तिच्यांत राहिले नसलें तर ? मग तुम्ही सुटाल आणि असेच तुम्ही आजवर सुटत आला आहात, नाही तर ......... !

१२-४-३९

—११—

# नागपूर ते बडनेरा ×

जो प्रकार मला वर्णन करायचा आहे, तो अवघ्या चार तासांत घडला. तो एखादा अत्याचार नव्हे की, त्याचें रसभरीत वर्णन केल्याने तुमच्या चित्तवृत्ति थरारून जाव्यात. चकमकदेखील घडली नाही कांही. फक्त नागपूरमेल नागपूर स्टेशनपासून निघून बडनेऱ्याला पोचेपर्यंत जो प्रकार त्या दोन डब्यांत घडला, तोच मला सांगायचा आहे.

अगदी साधी गोष्ट, की जिच्यावर गोष्ट लिहिणें मुश्किल आहे.

पूर्वी मुंबईला जाणारी कलकत्ता-मेल नागपूरहून ४-३५ ला दुपारीं सुटत असे. वीस मिनिटें तिचा स्टॉपेज् होता. त्या दिवशीं काय कारण होतें कळत नाही, पण ती दहा मिनिटें आणखी थांबायची होती.

स्टेशनवर तार देण्याच्या फळीजवळ एक अठरा-एकोणीस वर्षांचा मुलगा उभा होता. पायांत चांगले चकचकणारे जोडे, तलम धोतर, साधे उंची कपडे, हातांत सोन्याचें घड्याळ.

---

× हें प्रवासवर्णन नव्हे!

## नागपूर ते बडनेरा

कुणाची तरी तो वाट पहात होता; तथापि ज्या व्यक्तीची तो वाट पहात होता, ती व्यक्ति यावीच असें त्याला वाटत होतें किंवा नाही, हें सांगणें फार कठीण होतें. दोन–तीनदा त्याने खिशांतलें पाकीट चाचपून पाहिलें व पाकिटावर हात असतांनाच त्याने भोवताली नजर फिरवली. हेतु उघड होता. त्या पैशाचें त्याला कांहीतरी घ्यायचें होतें; पण इतक्या पैशाचें काय घेणार? व्हीलर फार तर आठदहा आणे खाईल. चहा बिस्किटें– पण त्यांच्यासाठी त्याच्याजवळ वेगळे पैसे होते. आइस्क्रीम- पण तोही मनसोक्त खाल्ला होता. अशी एकही वस्तु त्याला दिसली नाही की, जिच्यास्तव त्याच्या पाकिटांतले तीस रुपये त्याने खर्चावे. त्या पैशांचा त्याला कुणीही हिशेब मागणार नव्हतें; आणि असले पैसे सत्कार्य व दानधर्म यात कधीच खर्च करायचे नसतात.

मग हे तीस रुपये कसे खर्च करणार?

चांगला श्रीमंत होता तो. त्याला मुंबईला जायचें होतें. त्याच्या वडिलांनी सेकंड–क्लासच्या तिकिटापुरते भरपूर पैसे त्याला दिले होते.

—आणि त्याने काढलें तिसऱ्या वर्गाचें तिकीट. नंतर त्याच्याजवळ तीस रुपये शिल्लक उरले. हेच रुपये खर्च करायसाठी तो कोणाची तरी वाट पहात होता.

आगगाडी सुटायला अजून तब्बल १० मिनिटें होतीं. म्हणजे गाडीला आरंभापासून अखेरपर्यंत एक चक्कर देऊं शकत होता

तो. त्याचे पाय चटकन वळले.

गार्डाचा, ब्रेकचा आणि त्याच्याजवळील दुसरा डबा यांत खास पाहण्यासारखें कांही नसतें. तो पुढे निघाला. एक, दोन, तीन आणि चवथ्या डब्याशी तो एकदम थबकला.

तरी ती त्याला पुरती दिसलीही नव्हती. डाव्या बाजूने उगीच थोडा चेहरा त्याने पाहिला. पाठमोरी होती ती. तरतरीत नाक, पाणीदार डोळे, विस्तीर्ण कपाळ वगैरे सगळे त्याच्या कल्पनेचे खेळ होते. त्याने फक्त तिचा नितळ, गोरापान, नाजुक असा सबंध उघडा हात, अंगांत अस्मानी रंगाचा ब्लाऊझ व जरतारी किनारीचें, गडद हिरव्या रंगाचें तलम लुगडेच पाहिलें होतें व एवढ्यावरूनच ती जे पुस्तक वाचत होती, ते मोठें गंभीर आणि तर्कशुद्ध असावें, असा त्याने कयास बांधून टाकला होता.

पण त्याला तिथे फार वेळ तसेंच पहात राहणें अर्थातच शक्य नव्हतें. कारण तें असभ्य दिसलें असतें व फुकटच्या फुकट स्वतःला असभ्य म्हणवून घेणें कुणा शहाण्याला आवडेल ? त्याने जें पुढे पाऊल टाकलें, तें याच विचाराच्या अनुरोधाने. तो पुढे गेला खरा, पण अगदी शेवट एंजिनपर्यंत त्याच्याने जाववलें मात्र नाही. मधूनच तो परतला व आपण कांही तरी विसरलों असा, लोक पाहतात या जाणिवेने, आविर्भाव आणून आपलीं पावलें त्याने झपाझप मागे परतविलीं.

विशिष्ट डब्याजवळ थांबतांना त्याला अर्थातच स्वतः पैसे मोजून पाहण्याचे निमित्त करावें लागलें, हे वेगळें!

आणि एकदम असें वाटलें त्याला की, आपण जवळचे तीस रुपये अगदी योग्य रीतीने खर्च करूं शकूं. रुपयांचा हिशेब विचारणारें जसें त्याला कुणी नव्हतें, तद्वत् त्याच्या वर्तनाचीही हिशेबतपासणी होणार नव्हती.

त्याने मनाशीं ठरविलें—आता हिच्याशीं बोललें पाहिजे! वाटेल तें होवो! प्रथम असाच विचार त्याला सुचला की, आपलें सामानच त्या डब्यांत कोंबावें. तथापि तो डबा "बानुओ माटे" होता आणि मेल चार मिनिटांत सुटणार होती. मनाशीं काहीतरी संकेत बांधीत तो स्वतःच्या डब्याकडे गेला आणि कसाबसा आंत चढतो, तोंच मेल सुटली. आपलें सामान आवरून नीट ठेवायचेंही त्याला सुचलें नाही. तो काहीसा अस्वस्थ झाला. आता मेल थांबणार, ती एकदम वर्धेलाच, म्हणजे अजून एक तास.

डब्यात सभोवार त्याने नजर फिरविली. कुणी म्हणतां कुणी ओळखीचें दिसेना. एखादा जिवलग मित्र असता, तर त्याने या बाबतींत त्याला मसलतींत घेऊन त्याचा सल्लादेखील घेतला असता. स्त्रीच्या सौंदर्याचें केवढें आकर्षण असतें, याची त्याला आजच जणु नव्याने कल्पना होत होती. आजवर रणांगणाची ही आघाडी त्याने पाहिलीच नव्हती. आतापर्यंत त्याच्या सबंध

आयुष्याचा इतिहास एका प्रकरणांत संपून गेला असता व त्या प्रकरणाचें नांव ‘ बाललीला ’ असें राहिलें असतें. मात्र आज नवेंच कांहीसे त्याला वाटूं लागलें व जसजसें पैशाचें पाकीट तो चाचपूं लागला, तसतशी त्याची इच्छा अनावर होत गेली.

त्याला कांहीएक करायचें नव्हतें—फक्त दोन शब्दांची तिच्याशीं देवघेव. दोन शब्दच तिच्याशीं बोलायचे. बाकी कांही नाही. येथून त्याच्या विचाराला सुरवात झाली. त्याला वाटले, हे सर्व पैसे तिला द्यावे आणि म्हणावें, ‘ जरा बोल ! ’ तथापि तिचें त्या वेळचें बोलणे म्हणजे चंडिकेचा कडकडाट झाला असता. मग काय करायचें ? त्याने असें कुठेसें वाचलें होतें की, रुबाबदार चेहरा आणि ऐटबाज पोषाख बायकांना आवडतो. तिकीट—कलेक्टरशी दोस्ती लावावी आणि असा पोषाख करून तिकिटाच्या निमित्ताने तिच्यापुढे जावें; पण जर का तिकिट-कलेक्टर खमक्या मिळाला, तर सगळेंच मुसळ केरांत ! अर्थात् हा विचारदेखील मनांतून काढून टाकावा लागला. त्याने आपले कपडे पाहिले. ते तर अगदी फडक्यांच्या भाषेंत सांगायचें म्हणजे ‘ झकास ’ होते; पण रुबाबदार चेहऱ्यासाठी मिशा कुठून आणणार ? तथापि ज्यांना मिशाच नसतात, त्यांच्यावर स्त्रिया लुब्ध नसतात, असा दाखला कुठेच सापडण्यासारखा नव्हता ! तेवढेंच समाधान !

या व अशा रीतीने जसजसा तो विचार करायला लागला,

तसतसें त्या स्त्रीशी बोलण्याचे निमित्त काढणें, त्याला जड जाऊं लागलें. ती त्याची आई, बहीण, मावशी थोडीच होती की, त्याने तिचा पाण्याचा तांब्या भरून आणावा आणि दोन थापा हाणून द्याव्यात ? परस्त्री!– या एकाच शब्दाने त्याला अगदी नवे नवे पण अलभ्य अलभ्य असें कांहीसें वाटलें आणि जसें वाटत गेले, तसतशी त्याची तिच्याशीं बोलण्याची इच्छा बळावत चालली.

सगळें डोकें खर्चे झालें. ( म्हणजे होतें हे उघड आहे ! ) डोकेंही एकच ! उपाय सुचेना. नागपुरी मुले या बाबतीत जराशीं कच्चींच असतात. उगीच कुणाशीं सभ्यतेचा आव आणून चार शब्द बोलणें त्यांच्या रक्तांतच नसतें. ‘अहो ताई’ किंवा–‘ बेन, बेन ’ म्हणून ओळख चिकटविणारा पुण्याचा अगर मुंबईचा विद्यार्थी या बाबतींत खरेंच वरचढ आहे.

पण दुर्दैवाने उभ्या गाडींत त्याला असा विद्यार्थी देखील भेटला नाही. तात्पर्य असें की, आहे या मनःस्थितींत, एक मन उगीच ‘ नाही नाही ’ म्हणत असतांना तिच्याशीं बोलणे त्याला शक्य नव्हते.

म्हणजे, आता ही मनःस्थिति बदलणें अगत्य विवेकाची टोचणी कमी कशी करायची ?

हाच, हाच विचार नक्की करून वर्धेचे स्टेशन कधी येते, याची तो वाट पहात बसला.

गाडी पूर्ण थांबलीही नव्हती, तरी तो खाली उतरला आणि

ठरलेले बेत, संकेत, सगळें विसरून त्या डब्याकडे त्याने धाव घेतली. तिथे तो पोचला. त्याने तिला पाहिलें. तो दोन पावलें पुढेदेखील सरसावला. पण—

पण काय ? आली स्वारी परत पुनः !

आणि दुसरा कांहीएक विचार न करतां गार्डाची पैशाने परवानगी घेऊन तो मेलच्या फराळाच्या डब्यांत घुसला. वेटरला महागांतले महाग पदार्थ त्याने आणायला सांगितले व एक चांगलीशी बाटली पण घेण्याचें त्याने ठरविलें. मद्यमांसाने मस्तपणा, धुंदी येते, असें म्हणतात. तोच प्रयोग 'सत्त्याचा' म्हणून तो आता करणार होता. पहिल्या वर्गाचे सगळे पदार्थ, परवानगीदाखलचे पैसे, बाटलीची किंमत, सिग्रेटचा टिन, वेटरला दिलेली श्रीमंती चिरिमिरी–एवंच, एकूण स्वारीने वीस रुपये तर कसेबसे रेटले.

हें सगळें फस्त करून पुलगावच्या स्टेशनवर तो जो खाली उतरला, तो अगदी तर्र होऊन. घाईघाईने तो पुढे गेला. त्या वेळेला कदाचित् तो बोललाही असता; पण त्या डब्यांत त्या जागीं कुणी नव्हतें. सामान तेथेच, पुस्तकें तशींच, वर्तमान-पत्रही तेंच ! आणि ही स्त्री गेली तरी कुठे ? परन्तु तिची वाट पहात दाराच्या दांड्याला धरून तिथे फार वेळ उभे राहणेंही शक्य नव्हतें इतकें समजण्यापुरता तो खचित शुद्धीवर होता.

हें असें बिचाऱ्याचें पुलगावदेखील गेलें.

राहतां राहिलें बडनेरा ! चांगलें मोठें स्टेशन. उतारूंची जेवायची वेळ म्हणून गाडी तेथे बरीच थांबते. आपण तिला जेवायचा आग्रहच करूं. काय वाटेल तें झालें, तरी आता वीस रुपयांची ही किंमत दिली तर तिच्याशीं बोलूंच, हा विचार त्याने हलवून हलवून बळकट केला. त्याच्या निश्चयाच्या आड कांही येतां कांही कामा नये, असें त्यानें ठरवून टाकलें व तास-सव्वा तास बडनेऱ्याची एखाद्या जिव्हाळयाच्या मित्रासारखी वाट पहात तो बसून राहिला.

आगगाडी स्टेशनांत घुसली. आता तिला जेवायलाच बोलवावयाचें असल्यामुळे पहिलीं चारदोन मिनिटें त्याने मुद्दाम उशीर केला व सावज हातांत गवसलं, अशी खात्री झालेल्या शिकाऱ्याप्रमाणे तो सावकाश त्या डब्याकडे जायला निघाला.

कधीकधी हातांत गवसलेली शिकारदेखील जाळयासकट पळून जाते आणि येथे तर 'जाळें' कशाचेंच नव्हतें. तो डब्यापाशी आला व त्याची भेट झाली.

पण ती मात्र एका म्हाताऱ्या हमालाशीं. त्याच्या दृष्टीने डबा रिकामा होता व तो हमाल सगळें सामान बाहेर काढीत होता. आजूबाजूची सगळी हवा बंद झाल्यासारखा त्याला भास झाला.

'कुणाचें रे हें सामान ?'

'त्या, त्या बाईचें.'

त्या बाई. दूरवर पुलाकडे त्याने नजर टाकली. होय तीच. त्याच पोषाखांत. तशीच पाठमोरी. तेच गोरेपान नाजुक हात ...दर पावलागणिक याच्या प्रत्येक आशेच्या दीपाला ती फुंकर घालीत चालली होती.

हमालाने सामान उचललें. झालें! वीस रुपये खर्च झाले! बाकी दहा राहिले!

ते देखील त्याला खिशांत ठेवावेसे वाटेनात. हसणार तरी कसा? व रडणार तरी कुणाजवळ? जी हुरहुर इतकी वाढली, ती आता थांबणार तरी कशी? ती आता परत यायची नाही व हे दहा रुपयेही त्याला खिशांत ठेवणें शक्य नाही.

स्वतःच्या डब्यांत तो परत आला. यंत्राप्रमाणे त्याच्या घडामोडी सुरू झाल्या.त्याच्याजवळ दोन ट्रंका होत्या. एक त्याने बाजूला ठेवली. वळकटींत दोन उशा होत्या. एक काढून त्याने त्या ट्रंकेवर ठेऊन दिली. एक पुस्तक, एक शाल! आणि बाकीचें सामान आवरून आपली वळकटी त्याने अंथरली. कुणाचें होतें तें सामान!

घाईघाईने तो खाली उतरला. सरळ बाहेर गेला. पुनः त्याने भोवताली पाहिलें. त्याला 'कुणीच' दिसलें नाही. तिकिट-ऑफिसांत जाऊन त्याने मुंबईचें एक तिकिट काढलें व

लागबगीने परत येऊन वेगळ्या काढलेल्या सामानांत त्याने तें ठेवून दिलें !

स्वतःचें तिकिटही नीट जपून पाकिटांत ठेवलें. त्याला जेवायचें नव्हतेंच !

आणि तो जो झोपी गेला, तो एकदम इगतपुरीच्या चहावाल्याचीच हाक त्याने ऐकली.

अर्थात् त्या सबंध रात्रीच्या गाढ निद्रेंत त्याला जीं स्वप्नें पडलीं, तीं कळलीं असतीं, तर फार फार बरं झालं असतं !

ता० १७।१०।४०

—१२—

# त्या आणि त्यांचीं दुःखें

समोर जें एक लिंबाचें झाड होतें, त्या झाडांतून चंद्राचे कवडसे नेमके त्या झोपडींत पडत आणि वारा येऊन ते हलूं लागले की, फारच छान दिसत. सरस्वती त्या झोपडींत झोपली होती. तिच्या पांघरुणावर चारदोन कवडसे पडले होते. जशा कांहीं तिच्या ओढणीला टिकल्या लावल्या होत्या. गरिबांना कुठूनतरी—कसल्यातरी स्वरूपांत वैभव मिळत असतें, हें खरें!

सरूने पटकन् डोळे उघडले. त्या उघडझापेंत कांहीही नव्हतें; पण तारुण्यांत काय चागलें दिसत नाही? त्यांतून आज तर तिचा आनंद ओसंडून चालला होता आणि त्या असीम सुखांतच ती झोपली होती. तिने आपल्या नवऱ्याला एका अत्यंत घाणेरड्या आणि निंद्य व्यसनांतून सोडविलें, हा तिचा केवढा नैतिक विजय! आज तिचा—संपूर्णतः तिचा असा — देवनाथ तिच्याजवळ सुखाने — न झिंगतां झोपला होता. रोजचें झोपणें आणि आजचें झोपणें! हृदयांत मावणार नाही, इतकें

समाधान तिला झाले होते या वेळी ! दिवसाभराचा सारा शीण कुठे पळाला होता देव जाणे !

कापसासारखी शुभ्र पुनव बाहेर साऱ्या वस्तूंवर साखरेचे रांजण उपडे करीत होती. एकाएकीं कावळे ओरडले ! अं ? सरूला आश्चर्य आणि एक प्रकारची भीति वाटली. ती उठली. बाहेर आली. बिचारे कावळे ! चटक चांदण्याच्या लख्ख प्रकाशांत त्यांना वाटले दिवसच निघाला. ते जागे झाले—आपल्या कामासाठी कावकाव करूं लागले. त्यांची ही कर्तव्यपरायण मूर्खता, हा निरपराध वेडेपणा, पण त्यांतही सरूला केवढे सत्य दिसलें ! यंत्राचा वेग वाढवून माझ्या देवनाथपासून असेच जास्त काम घेतात; त्याला कांहीही कळत नाही. हा विचार तिच्या मनांत आला.

परंतु आज मुळीसुद्धा दुःख करायचे नाही — शक्य तितकें देवनाथला सुख द्यायचे, हा विचार तिला घरांत घेऊन गेला. आपल्या बिछान्यावर पडणं तिच्या स्वाधीन होतें; पण झोप ? एकदा तिला वाटलें देवनाथला उठवावे—पण छे ! आज तो कितीतरी दिवसांनी सुखाने झोपला होता. लहान मुलासारखें तिने त्याला थोपटून निजविलें होतें. आपल्या कृतकर्मांचे हुंदके, आंचके देत देतच तो झोपला होता आणि त्याला उठवायचें? रात्रीचा प्रसंग तिच्या डोळ्यांसमोर उभा राहिला. वासरू जसे गाईकडे धांव घेतें, तसा आधारासाठी देवनाथ तिच्याकडे धावला.

तिच्या हृदयांत दुधाचे रांजण असतील, म्हणूनच ना ?— कधी कधी दुःखांत देखील मनुष्य हसून देतो. गरिबींत सुखच नसतें, असें जर त्या वेळीं तिला कुणी सांगितलें असतें, तर ती तिरस्काराने—अविश्वासाने हसली असती.

जागेपणचीं स्वप्नें पाहण्यांत दंग असणारी ही सरू कोंबड्याची पहिली बांग ऐकतांच खडबडून उठली. आपल्या नवऱ्याला पांघरूण वगैरे घालून तिने एकदा हलूच थोपटलें. त्याच्या सुखांतच जणुं तिचें सुख होतें ! स्त्रीची सुखाची लालसा अशी आध्यात्मिक असते कीं काय— न कळे ! एरव्ही वात्सल्याची परमावधी तिच्यांत आढळती ना ! सरूने सारें काम आटोपलें. नवऱ्यासाठी पाणी तापविलें. घर सारवून उरलेल्या शेणाच्या गोवऱ्या थापल्या. शेजारच्या वकीलाने म्हैस घेतल्यापासून तिला शेण भरपूर मिळत असे. दुधाची मात्र अर्थात् ऐपत नव्हती. वकीलाच कधी दुधाचें चोपडपण लाभलें नाही—मग इतरांची गोष्ट कशाला ? पण आज सरू दूध घेऊन आली. देवनाथ जागा होईपर्यंत भाकर झाली पाहिजे. तो उठावयाच्या अगोदरच तिने सर्व तयार केलें आणि त्याच्या जागे होण्याची वाट 'पहात त्याच्या शेजारीं जाऊन बसली. थोड्याच वेळांत तो उठला. त्याचें सर्व यथास्थित तिने करून दिलें आणि तो कामाला गेल्यावर झोपडीचें फाटक लावून मोठ्या उल्हासाने ती

लोकांचीं उष्टीं-खरकटीं करण्यास निघाली.

रामनारायण नांवाचा सालस गृहस्थ एकटाच रहात असे. रोज घरून निघतांच ती प्रथम त्याचें काम करावयास जाई ! एक तर काम थोडें—शिवाय एक घर आटोपल्याचे समाधान मिळून तिचा जीव खाली पडे; पण आज तिला त्याच्याकडे जावेंसें वाटलें नाही. कारण काय हें मात्र तिला सांगतां आले नसतें. आज प्रथम अशाच भरल्या घरीं जायचें की, जेथे आनंद, सुख, पाखरासारखी चिलबिल दृष्टीस पडेल. आपल्या आनंदी, सुखी मनाचें प्रतिबिंब सृष्टींतही दिसावें, अशी तिची अपेक्षा !

आणि म्हणूनच तिने प्रथम इंदिराबाईच्या घराचा रस्ता धरला. किती सुखाचा त्यांचा संसार ! म्हणावयाला दोन मुलें आहेत; पण बाई किती हौशी ! नवरादेखील किती चांगला आहे बिचारीचा ! असल्या पुण्यवती सुवासिनीचेंच आज प्रथम दर्शन घ्यायचें !

अर्थात् इंदिराबाईचें तोंड उतरलेलें, मुद्रा त्रासलेली दिसतांच तिला नवल वाटलें – ती थोडी वचकलीदेखील ! किती गोड अपेक्षा व कल्पना करीत ती आली होती ? पण आज तिच्या मालकिणीने तिला एका शब्दानेहि विचारलें नाही. बिचारी सरू मुकाट्याने कामाला लागली.

चहाचीं भांडी उचलावयास दिवाणखाण्यांत जातांच तिला

तेथे एक बाई दिसली. मोठीं छान, तरुण, सुंदर व आनंदी अशी ! तिचा मालक त्या नवख्या बाईशीं गप्पा मारीत होता. तिच्या मनात काय कल्पना आली देव जाणे ! पण तिने एकदम इंदिराबाईकडे पाहिलें. आणि पाहताच तिला कळून चुकलें की, आजचा रागरंग जो फिरला, तो या बाईमुळेच ! त्यांतून ' आतांपर्यंत पत्रांवर तरी निभलें ! ही कसली कॉलेजची मैत्री अन् या कसल्या भेटी ! ' इत्यादि वाक्यें जी इंदिराबाई हळूच पुटपुटत होत्या, त्यावरून सहज कयास बांधण्यासारखा होता. पुन्हा जिच्या लग्नाचा मांडव अजून सुकलाहि नव्हता, त्या सरूला ही गोष्ट समजणें कठीण होतें काय ? ती आपली पुन्हा कामाला लागली.

सरूचा उत्साह, कामाचा उरक वगैरे त्या नव्या बाईलाहि आवडला. ' ही पोर मोठी छान मिळाली बरं का इंदिराबाई तुम्हाला ! ' ती म्हणाली. इंदिराबाईशीं बोलायचें निमित्त व विषय काय— तर सरू मोलकरीण ! समुद्राचे पाणी पोटांत गेल्यासारखें इंदिराबाईंनी तोंड केलें. सरूला मात्र बिचारीला कधीही न मिळणारी दोन बोलणीं खावीं लागलीं.

' एकेक दिवस असाच निघतो. '

सर्वांवर ताण करणारें हें सरूचें तत्त्वज्ञान होतें !

तथापि ही तिरसटपणाची वागणूक स्वतः इंदिराबाईंनाच असभ्यपणाची वाटली. खरेंच ! त्या बाईने काय केलें आपलें ? ती

आली, हसली, खेळली, बोलत बसली ! पण अजून ती अज्ञान, अल्लड आहे. पुढचे जीवन तिला फुलासारखें दिसतें आहे. विवाह झाला की, सारें कळेल तिला आपोआप ! पण आपले पतिराज ?

आणि इंदिरेचा मुख्य रोख आणि रोष पतीवरच होता. विनायकरावांनी येथे मुद्दाम माझ्यादेखत तिला आणून मला का हिणवावें ? माझ्यांत सारें सुख पाहणारे ते, त्यांनी असें कां करावे ? मी नाहीं का त्यांशीं बोलतखेळत ? त्यांचीं मुले, त्यांचा सर्व व्याप मी नाही का सहन करीत ? असा विचार येतांच तिला स्वतःबद्दल एक प्रकारचा मोठेपणा वाटला. संसारांत आपली भूमिका किती अपरिहार्य आहे, विनायकरावांचें आपल्यावाचून किती अडून जाईल, याची तिला कल्पना आली व म्हणूनच विनायकरावांच्या अपराधांचीही जाणीव जास्त तीव्रतेने होऊं लागली. मैत्रीण झाली, म्हणून काय झालें ? मला एखादा मित्र असता, तर त्याची पत्रास माझ्या पतीपेक्षा ज्यास्त मी कधींच ठेवली नसती. माझं अंतःकरण त्यांना कळत नाही. मी द्वेष कां करतें कुणाचा ? मला माझ्या प्रेमांत कुणी नको, असें कां वाटतें ? माझ्या असीम प्रेमाचेंच तें द्योतक नव्हे का ?

परंतु एक शंका तिला बोचली. पुरुष पाहिला की, ज्या सहज भावनेने, ज्या सहज जाणिवेने आपण पदर नीट करतों–

केस सावरतों त्याच स्वाभाविकतेने विनायकराव वागत- बोलत नसतील कशावरून ? पण ही कल्पना क्षणभरच ! पाण्याचा लोंढा ज्याप्रमाणे वाळू बरोबर त्यावरील चकचकीत शिंपाही वाहून नेतो, त्याप्रमाणेच ही कल्पनादेखील वाहून गेली. पुन्हा विचारचक्र सुरू झालें. विनायकराव—त्यांची मैत्रीण — स्वतः इंदिरा — तिचे प्रेम — मुलें — त्यांची निष्पाप चिवचिव — किती किती प्रकारचे विचार होते देव जाणे ! आताच तर कितीतरी वेळ होऊन गेला. शरिराने मात्र काम, व्यवहार सारें सुरूच होतें.

सर्वांची जेवणें झालीं. कचेरींत जातांना विनायकराव इंदिरे-जवळ आले. मोठ्या प्रेमाने, उल्हासाने तिच्याकडे पाहून त्यांनी जातों, असें सुचविलें; पण त्यांच्या या सौहार्दाचें बक्षीस इंदिरेने त्यांना रोजच्यापेक्षा फार वेगळे दिलें. तिची ती शून्य दृष्टि, तो अर्थबोधविरहीत चेहरा पाहून विनायकराव थिजून गेले असतील, यांत नवल नाहीं. ज्यास्त कर्दमांत पाण्यासारख्या जीवनदायी पदार्थाचेंदेखील बर्फ होतें. त्यांतून विनायकराव पडले पुरुष ! संघर्षप्रिय, प्रत्याघात सहन करणारे खरे — पण उदासीनतेने वठणारे !

नविन बाई बिचारी विश्रांतीसाठी पडली व झोपीही गेली. इंदिरा देखील पतीच्या खोलींत जाऊन पत्रे, फोटो, मागील भेट, वस्तु वगैरे काढून मन रमवूं लागली; पण आपणांला चांगले

वाटणारे विचार मोठ्याही प्रेमाने त्यांना जवळ बोलाविलें, तरी येतात का ? उलट दूर दूर पळून जातात आणि जे नको ते मात्र दारावरच्या लोचट भिकाऱ्याप्रमाणे येऊन त्रास देतात.

आणि जेव्हा खूप त्रासिक करुद्ध आवाजाने इंदिरेने सरस्वतीला हाक मारली त्या वेळी तिचे बिचारीचे काळीज थरारलें. ' आणखी बोलणीं बसणार की काय ? आपला आनंद परमेश्वर असाच विझविणार का ? आपल्या हर्षाचा पडसाद कुठेच उमटत नाही. आपला देवनाथ देखील सायंकाळपर्यंत आपल्याला भेटावयाचा नाही. '

हे विचार करीत भीतभीतच ती वर आली आणि आवडत्या मालकिणीकडे तिने अशा काही दृष्टीने पाहिलें की, डोळ्यार्शी डोळा भिडतांच इंदिरा विरघळून गेली. तिला जाणवले की, आपण हिला सकाळीं उगीचच बोललो. किती मरमरते बिचारी आपलें काम करायला ! आपण त्याचा मोबदला काय देतों ?

' सरू, काय करूं ग ? तुझ्याशीं दोन गोड शब्द बोलण्याइतकेही माझें मन स्वस्थ नाही. तूं तरी मला सुखी रहायला शिकव. '

सरू मालकिणीला शिकविणार ? तिच्याजवळ काय होते ? होय, एक शक्ति होती—ज्या शक्तीने तिने देवनाथवर विजय मिळविला होता, ती त्यागाची, वात्सल्याची, आपल्यावर असलेल्या जबाबदारीची, पतीची सर्व प्रकारची भूक शमविण्याची शक्ति तिच्यांत

होती. त्या शक्तीचा थोडासा जरी अंश तिने इंदिरेला शिकविला असता, तरी इंदिरेचें मन आभाळाएवढें मोठें झालें असतें व हिरवा चारा पाहून हरीण जसें धावत येतें तसेंच विनायकराव तिच्याकडे आले असते; पण हें मालकिणीला कसें शिकविणार? सरू बिचारी लाजली.

‘ बाई, कशाला बोलावलं होतं मला ? ’

‘ हं, तूं जा माझ्या दादाच्या घरीं ! परवा गेली होतीस ना ? आणि त्याला म्हणावं वहिनीला आजचा दिवस माझ्याकडे रहा-यला पाठव. ’

सरू लागलीच निघाली. वहिनीबाई आली, तर आपली माल-कीण खरोखरच थोडीशी खुलेल, या भोळया भावनेने व सुखा-च्या कल्पनेने ती झपाझप पावलें उचलूं लागली. त्या रस्त्याच्या डाव्या बाजूने जो फाटा फुटत होता, त्याच्याच शेवटीं सरूचें घर होतें. देवनाथ संध्याकाळीं पांचला घरीं येईल, त्या वेळी घर चांगलें दिसावें, म्हणून धावतच ती घरीं गेली व मागल्या पावलीच परतली. इंदिरेच्या भावाच्या घरी पोचताच तिने दारावर थाप मारली. दरवाजा उघडला गेला. झर्कन् ती इकडेतिकडे न पहातां सरळ घरांत वहिनीबाईकडे जाऊं लागली —मोठ्या उत्कंठेने — एक प्रकारच्या समाधानाने !

× × ×

अर्ध्या तासांत सरू बाहेर पडली. एकेक पाऊल बेडीने जख-

डल्यासारखें जड पडत होतें. फाटकाच्या बाहेर पडल्यावर तिला तें आपल्यामागे लोटून घेण्याची देखील शुद्ध राहिली नव्हती. तिच्या मधाच्या गतीत आणि चेहेऱ्यांत किती अंतर पडलें होतें. आपलें सर्वस्व गेलें, याची जाणीव झाली, म्हणजे जसें सारें शून्याकार दिसतें आणि त्याकडे पहात असतांना दृष्टींत जसा अनर्थ भरले-ला असतो —तशी तिची चर्या अभद्र झालेली होती. तिच्या कल्पनेंतल्या साऱ्या गोष्टी उन्हांत ठेवलेल्या फुलासारख्या करपून गेल्या होत्या. खरंच असें काय घडलें की, वायुवेगाने, उल्हासाने गेलेली सरू अशी विचारमूढ गलितगात्र होऊन परत यावी ?

आता तिला वर जावेंसें वाटेना. मालकिणीला निरोप काय सांगायचा ? निरोप सांगून अर्थ काय ? आणि वहिनीने निरोप तरी काय सांगितला ?

‘ का ग सरू—काय म्हणाला दादा ? ’

सरू चूप !

‘ तूं जाऊन आलीस ना ? ’

‘ होय, वहिनीबाई घरीं नव्हत्या. ’

इंदिरेने तिच्या तोंडाकडे पाहिलें. तिला चरकल्यासारखें झालें. सरू अशी का दिसते ? तिला झालं तरी काय ?

‘ सरू, अग बोलत कां नाहीस ? सांग, सांग ना ! ’

तिच्यांत बोलण्याची शक्ति उरली नव्हती.

‘ बेटा, सांग वहिनी कुठे गेली होती ? ’

बेटा ! कितीतरी काम केवळ एवढ्या एका शब्दाने केलें. सरू रडूं लागली. तिचें चैतन्य परत आलें आणि त्याबरोबर क्रोध भीतीदेखील—

‘ बाई, माझी आपल्याला हात जोडून एक विनंती आहे. ’

‘ काय ती ? ’

‘ मला यापुढे तुम्ही आपल्या भावाकडे कधीही पाठवूं नका. ’

सरूची मुद्रा, तिचा त्वेष आणि अशा प्रकारची ही विनंती ! इंदिरेने — विवाहीत इंदिरेने— सर्व कांही ओळखलें. तिला कारणांचीही कल्पना आली. स्वतःचें तुच्छ, चिमुरडें क्षुल्लक दुःख ती विसरली. तिचा भाऊ नी असा— ?

‘ अरेरे, वहिनी ’—

तिच्या हातीं या वेळीं जगाचें राज्य असतें, तर तिने सरूच्या अश्रुगणिक माणसांचीं खांडोळीं केलीं असती, इतका तिचा संताप सात्त्विक आणि प्रखर होता.

‘ सरू, तुला पाठवायाचें दूरच, पण मी देखील माझ्या भावाचें तोंड पाहणार नाही. अवघं जग त्याच्या तोंडावर थुंकलं, तरी मला मुळींच वाईट वाटायचं नाही. मी आता या क्षणीं त्याच्याकडे जातें आणि ’—

‘ नका बाई, मी स्त्री आहें, मला संसार आहे ’

‘ तूं काळजी नको करूंस सरू. मी तुला जन्मभर अंतर देणार नाही. तुझ्या नवऱ्यालाही पाहिजे तर मी नोकरी देईन. ’

‘ बाई, मला त्याची भीति नाही. देवाने हातपाय दिले आहेत. कुठेही काम करून—’

‘ मग तूं अशी भितेस कां ? सांग, मी काय करूं तुझ्यासाठी ? ’

केवळ सरूचाच नव्हे तर साऱ्या स्त्रीजातीचा कैवार घेण्याची इंदिरेची त्या वेळची भूमिका व क्रोध होता.

‘ एवढेंच करा— तुमच्याशिवाय कुणालाही ही गोष्ट कळूं देऊं नका. त्यानंच माझं कल्याण होईल. कालच माझा पति मला परत मिळाला. माझ्या जिवाची साक्ष देऊन हें मी त्याला सांगितलं तरी प्रत्येक वेळीं त्याचं मन बिचकेल. गरिबी नशिबीं आली. घरीं स्वतःला कोंडून घेतां येत नाही. जें झालें तें माझ्या हातून झालें नाही. माझा त्याच्यांत तिळमात्र दोष नाही. ही गोष्ट चार ठिकाणीं केल्याने तुमच्या भावाची छीः थूः होईल आणि माझ्या सूडाची हौस भागेल हें खरें ! पण माझा नवरा मात्र माझ्यापासून कायमचा दूर जाईल. त्याच्याकरिता मी काय वाटेल तें पापदेखील करीन—मग एवढी गोष्ट लपवून ठेवण्याचे काय ? मला जगायला साधन आहे, तें नाहीसें करूं नका. मी पापी असलेंच, तर देव मला पुढील जन्मीं शिक्षा देईल; पण हा जन्म मला माझ्या देवनाथ बरोबर सुखाने घालवूं द्या. मेल्यावर

मी एकटी दुःख भोगीन. पण नसतें दुःख सध्या निर्माण करूं नका.'

'पण सरू, येथे तूं चुकतेस.'

'चुकूं द्या, काय वाटेल तें होऊं द्या. बाई, एकतर आम्हां गरिबांत चांगलीं माणसं मिळत नाहीत. अवघ्या गोष्टींपेक्षा मला माझा पति प्रिय आहे. एवढ्याशा कारणासाठी माझं जन्माचं सुख नाहीसं करू नका. माझं नुकतंच लग्न झालं आहे-माझी हौस फिटली नाही.'

'सरू'

'नाहीं— तुम्हांला मालकांची शपथ आहे.' असें म्हणून सरू भराभर जिन्याच्या पायऱ्या उतरून खाली गेली. इंदिरा जागच्या जागींच स्तब्ध बसून राहिली. तिला आजच्या आपल्या स्वतःच्या वर्तनाची लाज वाटूं लागली. सरू-सारखी यःकश्चित् मोलकरीण आपल्या पतीला सुखी करायला किती जीवापाड धडपडते.

आणि आपण ?— विनायकराव कचेरींत जातांना आपल्या-कडे केवढ्या प्रेमाने आले आणि हिरमुसले होऊन परत गेले, त्या वेळचें आपलें वागणें ? तें चित्र इंदिरेच्या जिवाला बोचूं लागलें. विचारतंद्रींतच ती पुढचे व्यवहार करूं लागली.

संध्याकाळी विनायकराव घरीं येतांच नेहमीच्या शिरस्त्याप्रमाणे स्वयंपाकघरांत न जातां सरळ माडीवर गेले. तों काय ? त्यांची

खोली आरशासारखी चक्क आणि इंदिरा त्यांची वाट पहात बसलेली! पण विनायकरावांचा जिव तिच्याशीं बोलायला धजावला नाही. ते मुकाट्याने कपडे काढूं लागले.

हें पाहून इंदिरा स्वतःच म्हणाली— ' आपण रागावलां होय माझ्यावर! मी आहें ना इथे!'

विनायकराव आश्चर्याने स्तब्ध! ही 'जादूची कांडी फिरली कशी?

' खरंच, माझी चूक झाली. '

विनायकरावाच्या मनांत असतें, तरी त्यांना यापुढे गप्प राहणें शक्य नव्हतें.

थोड्या वेळाने आनंदाने अश्रु पुशीत इंदिरा म्हणाली— ' सुखांत नसतीं दुःखं निर्माण करायची खराब संवयच आहे मेली मला! एवढ्याशा कारणांनी मी माझ्या सुखाचा चंद्र— '

आणि याच्यापुढे कुणाला तरी बोलणें शक्य होतें काय?

६-१०-३७.

—१३—

# मीलन

बाई ग ! कां अशी बिलगलीस त्याला ? तूं आता कितीही म्हटलेंस की, मी दूर होईन, तरी तुला तें आता शक्य नाही. पानांपानांतून फांद्यांफांद्यांतून तुझ्या पर्णशाखा गुंतल्या आहेत.

आणि तूं तरी अशी दूर कां होशील नि कशाला होशील ? तीं तुझीं फुलें—एकेक कसें उंचावून आकाशाकडे पहात आहे ! टिटवीचे सुंदर पायदेखील तुझ्या फुलाची बरोबरी करूं शकणार नाहीत. मोठ्या विस्तीर्ण हरित पर्णांवर उठून दिसणारीं तीं तुझी प्रफुल्ल सुमनें उफाळलेल्या समुद्राच्या मदमलिन फेसापेक्षाहि सुंदर दिसतात.

अथांग जलधीवर शेषाचें अंथरूण पसरून योगनिद्रेंत मग्न असलेल्या आदिपुरुषाचें पीतांबर तर नाहीना इथे या समुद्रावर वाळत टाकलें ? कुणाला वाटेल का की, तूं आनंदी नाहीस ? अशक्य, अगदी अशक्य !

पण बाई ग ! तो वृक्ष— ज्याला तूं कवटाळलेंस, तो तूं नीट निरखलास का ? त्याची तूं निवड केलीस ती तुला योग्य वाटली

का ? तुला हवासा वाटला का तो ? कीं जन्माच्या साथीदारा-बरोबर सुखाने रहावयाचें हाच तुझा त्यागमय सनातन नियम आहे ? — कुणाही कुलीन हिंदुस्त्रीसारखी तर त्यामुळे तुझी गत होणार नाही ना ?

सखें ! मला भीति वाटते. तें झाड 'हिवराचें' आहे. त्याचीं पानें देखील कशीं चिरमटलेलीं आहेत. त्याच्या त्या शेंगा बघ कशा खुरटलेल्या आहेत. त्याच्या गोरट्या सरस अंगकांतीवर बघ कसे फोड उठले आहेत.

आणि तरीदेखील तूं त्याला आलिंगितेस ?

हीं पहा आजूबाजूचीं झाडें ! कशीं कोवळीं आहेत. तुझ्याच बरोबरीचीं आहेत. कशीं जिवनाने भरलेलीं आहेत. किती उत्सुक !—त्यांतलें नाही का कुणी तुला आवडलें ?

काय, काय म्हणतीस ? ते उंच नाहीत ? तुझ्या शक्तीचा, प्रेरणांचा, प्रसभाचा विकास त्यांना सहन व्हावयाचा नाही ? ते तुला जमिनीवर फेकून देतील ?

होय ! तें खरं आहे. जो तुला उंच नेईल, जो तुझ्या साऱ्या शक्ति अजमावील त्यालाच तूं वरशील– मग असेनात त्याच्यांत थोडे दोष ! जीवनाशीं झगडावयाचें आहे. साथीदार खंबीर हवा ! गंगेने शंकरालाच वरिलें ! एरवी त्या जोगड्यामध्ये तिच्यासारख्या चटकचांदणीला भुलावण पाडण्यासारखें होतें

## यौवन

तरी काय ?

खरंच ! म्हटल्यावाचून रहावत नाही—किती गुणाची तूं !

पण तो पहा वारा आला ! त्या पहा शाखा शाखांना बिलगल्या आहेत—तो आवाज, कसा मधुर, सुखानिर्भर—स्तिमित—अहं, लाजूं नकोस. आम्ही पहात नाही हं !

हे पहा मिटले डोळे !

१-१०-३८

—१४—

# तुझ्याकरिता लिहिलेली

शकून ! किती वाट पहावी मी तुझी ? तूं आता येशील, मग येशील !

कुठेही कांही ओळखीचें वाटलें, कसलीही चिलत्रिल ऐकूं आली की, माझी शून्यांत विलीन झालेली पर्याकुल दृष्टि मी दाराकडे लावी; पण काय ? गवताची काडी उचलून एखादी चिमणी भुर्रकन् उडून जातांना दिसे. 'आपल्या घरट्याकडे जाईल ती'— असेंच कांहीतरी, कसेंतरी मी म्हणायचें, पुन: आंत नजर ओढायची, पुन: कसलींतरी चित्रें पाह्यचीं. पुसट पुसट, अर्धवट !

तथापि शकुन्तले ! जाऊं दे त्या गोष्टी. मी उदासीन व्हायचें सोडून देणार आहें. नाहीतर तो माझा एक स्वभावच होऊन बसेल. त्यांतच मला आनंद वाटेल. आणि तुला तें सहन होणार नाही.

या साऱ्या यातना, हीं सारीं दु:खें मी काळजाच्या

एका कोपऱ्यांत दडपून ठेवणार आहें. कुठेतरी दृष्टीचा वेध लावीन; व तुझी आठवण — ती हिमतुषारासारखी सुखवेल मला त्या वेळीं !

मी माझें कर्तव्य करीत राहीन. बरेंच अंतर चालून जायचें मी ठरविलें आहें.

सारें मनासारखें होईल—नव्हे, मी तें घडवून आणेन. कधीतरी आडवेउभे करून ठेवलेले विरविरीत धागेदोर जवळजवळ येतील. आताचे हे झाकून दडपून ठेवलेले निराशेचे क्षण—पण नंतर त्यांचें काय ! ते देखील झोपेंतून उठल्यामुळे स्तिमितदु:ख होतील !

आजचे दिवस उद्या मी कल्पनेने पाहीन. शकून ! आज माझ्या ज्या ज्या निराशा तूं केलेल्या आहेस, त्यांची त्यांची तुला मी आठवण करून देईन. तूं कितीदा मला चुकविलेंस, किती थोडक्या थोडक्या कारणांवरून रडकुंडीला आलीस — खरंच चिडणार आहें मी तुझ्यावर याबद्दल.

आणि तूं ?—

तूं मात्र मला चिडलेला पाहून हसत रहाशील !

आणि मलासुद्धा हसावें लागेल !

पण छे ! मी नाही हसायचा ! २९-१०-३९.

—१५—

# अर्पण

अगदी नाजुक, मंद असा प्रकाश माझ्या डोळयांच्या झाकणांवरून हेलावल्याचा मला भास झाला. मी हळुच डोळे उघडले, डोळयांत झोप तशीच होती.

माझ्या उजव्या दंडावर विसावून झोपलेली कमल हलकेच आपल्या हातावर टेकून माझ्याकडे अगदी स्थिर दृष्टीने, तृप्तलोचनांनी पहात आहे असे मला दिसलें. तिच्या शातपणाला उपमा नव्हती. मघाशीच तिने मला झोपविलें व सारी रात्र ती दिव्याची वात सरकावून माझ्याकडे पहात बसली असावी. मला जी जाग आली. ती तिच्या नेत्रज्योतीच्या प्रकाशानेच तर नसेल ?

उशाशी थोड्या अंतरावर फुलवात मंदपणें तेवत होती. तिच्या प्रकाशलहरी हळूहळू सर्व खोलीभर पसरत आणि विचित्र अशा संवेदना निर्माण करीत. उदबत्तीचा धूर त्या उजळ अंधारांत तरल वलयें उत्पन्न करीत विलीन होत होता.

तें सगळें फार फार सुखद व स्वप्नमय होतें ! सगळे मनोभाव डोक्याशीं आणून, अवघ्या आनंदलहरी पापण्यांवर थोपवून

माझ्याकडे तिने आपल्या दृष्टीचा वेध का लावला होता ? तिचे कांहीतरी हरवले होतें का ? ती काय शोधीत होती ? नितळ, स्पर्शसुखद, मृदु अशा तिच्या शरीराच्या गाभाऱ्यांत दडलेले तिचें हृदय ! मला तें दिसत नव्हतें असें थोडेंच आहे ? लाल लाल अग्रें असलेल्या चमेलीच्या टपोर काळ्या ओल्या झिर-झिरीत कपड्याने झाकल्या, तरी त्या दिसतात ना ?— उलट सुंदरच दिसतात !

कमल माझ्याकडे का पहात होती ?

‘ तुम्ही जागे झालांत ? धक्का लागला माझा ? ’

‘ छे ग, पण तूं झोपत का नाहीस ? ’

‘ तुम्ही झोपेंतदेखील माझ्याचजवळ राहतां किंवा नाही, हें मी पहात होतें. ’

‘ बरं मग ... ? ’

‘ तुम्ही झोपा पाहूं ? — मिटा डोळे ! ’

माझी झोपायची मुळीच इच्छा नव्हती. तथापि मी डोळे मिटले. मला पुरेशी ऊब मिळाली. माझा श्वासही दबल्यासारखा वाटला. मनालाही तिच्या आज्ञा कळत होत्या आणि नंतर हळूच पुनः माझ्या छातीपर्यंत पांघरूण ओढलें गेले. नीरव शांततेच्या वेळीं झाडावर हळूच पाखरांचे पंख फड-फड व्हावेत; नाजुक चिव चिव, आणि पुनः सर्व लोपलें जावें !

ती फुलवात मंदपणें तेवत होती !

आणि हें असलें तिचें पाहणें आजचेंच नव्हतें. श्रांतपणें मी झोपलों की, तसेंच माझ्या निःस्तब्ध चेहऱ्याकडे पाहण्यांत तिने रात्रीच्या रात्री घालविल्या होत्या. तो तिचा एक मनो-विलास, एकमेव विसावा, जागेपणींची स्वप्नमधुर झोप होती.

असले कसले बंध होते तिच्यांत नि माझ्यांत ?

परंतु मला उत्तर मिळावें, म्हणून हा प्रश्न मी विचारला नाही. माझ्या आयुष्याच्या सुरुवातीपासून मी हा प्रश्न विचारीत आलों आणि अंतापर्यंत कदाचित् मी माझ्याच मनाला विचारीत राहीन. तथापि त्याचें उत्तर मला मिळूं नये, हीच माझी अपेक्षा आहे. डोळ्यांवाटें माझ्या सर्वस्वाची ती साठवण करीत असली की, मला किती विसावल्यासारखें होतें, याची मला पुरेपूर जाणीव आहे. तिच्या मंद निःश्वासाचा स्पर्श माझ्या कपाळाला झाल्या-बरोबर कोणत्या संवेदना माझ्या शरिराला कुरवाळतात, हेंही मलाच कळतें आणि हेंच सुख पुनःपुनः मिळावें, म्हणून मी तो प्रश्न माझ्या मनाला विचारतों. या गोष्टी मी माझ्या मलाच सांगेन व माझ्या मीच ऐकेन.

लग्नापासूनच मी तिचा होतों, असें नव्हे. तें एक एकत्र यायला निमित्त झालें. मनोभावाने आयुष्यभर पूजा करण्याचा संकल्प केला, त्याचें हें फळ, असेंच कमल म्हणाली होती. आज तिला माझें वेड होतें; याचा मला अर्थतरी लावतां येतो. आज तिच्यांत कमालीचा बदल झाला आहे. तिची अंगकांति सुगं-

तल्या धान्यासारखी सतेज आहे. तिचे अवयव लतिकेसारखे सुकोमल आहेत. तिचे डोळे रत्नज्योतीसारखे उज्ज्वल आहेत. तिचें सुंदर शरीर व हर्षनिर्भर विशाल हृदय याची मोहिनी माझ्यावर पडलेली आहे. कदाचित् त्यामुळे आज मी तिचें ऐकत असेन, मी स्वतःला बांधून घेतलें असेन व त्या बंधनांत माझें मनही आनंद मानत आलें असेल—तिला वेडी वेडी म्हणूनही मी तिच्या आज्ञा यामुळेच कदाचित् पाळीत आलों असेन!

परंतु ज्या वेळीं ही फुलवेळ नुसती अंकुरित झाली होती, त्या वेळीं?

तेव्हा तर मला हेंही कळत नव्हतें कीं, तिच्या शरिरांत, तिच्या कांतींत, तिच्या नेत्रांत कांहीं विशेष आहे. तिचें हृदय म्हणजे तिच्या पांढऱ्या शुभ्र दातांतून ओसंडणारें हास्य, असाच माझा समज होता; मनोविलास म्हणजे हवें तें, हवें तसें खेळणें व हंसणें हाच होता.

तरी देखील तेव्हा तिने मला ताब्यांत घेतलें होतें. त्याकरिता तिला कधीही सक्ति करावी लागली नाही. वायूची लहर जशी हवी तेव्हा तरळते व तिच्याबरोबर सुगंध वहात जातो, तसेच तिचें व तसेंच माझें जगणें!

मग तेव्हाच्या तिच्यामाझ्याबद्दलच्या वेडाचा अर्थ काय?

ती आठएक वर्षांची होती. एकदा तेव्हा तिला असा संशय

आला की, मी पूर्वीसारखा तिच्यांत मिसळत नाहीं, जास्तीत जास्त वेळ तिच्या सहवासांत घालवीत नाहीं. तो संदेह तिला असह्य झाला होता. मला कांहीतरी वळण लावणें तिला अवश्य वाटत होतें. कसलातरी धाक, कसलीतरी जरब मला बसावी, अशी तिची इच्छा होती; पण तें काम किती कठिण ? कवीच्या भाषेंत सांगायचें म्हणजे, तें फुलपाखराच्या पंखावरची धूळ पुसण्यासारखें होतें !

तिने मला एकटें गाठलें. माझ्या सदऱ्याचें टोक धरून मला फरफटत ती घेऊन गेली. तिच्या एका मुठीत कांहीतरी वस्तु होती. ती एका झाडाजवळ मला घेऊन गेली. ते झाड कसले होतें, हें त्या वेळीं मला कळलें नाही. तें शेवरीचें झाड होते. त्यावर असंख्य पांखरांचीं घरटीं फुललेलीं होती. ती पाखरे सायंकाळीं किलबिल करीत आणि निजून जात. सकाळीं उठत व हवेवर उडत जात. नुकतीच जन्मास आलेली त्यांचीं ती पिले, ते लालवट गोंद, असा भास व्हायचा की, त्या शेवरीची लाल फुलेंच त्या घरट्यांत पोसलीं जात आहेत.

ती क्षणभर थांबली; नंतर शांतपणें तिने माझ्याकडे पाहिलें.

‘ तो तिथला दगड घे. ’

मी तो दगड निमुटपणे उचलला.

‘ हा खिळा घे. ’

मी तेंदेखील केलें. तिने एकदा झाडावर पाहिलें. जणुं त्या

चिमण्या जीवांना साक्षीला बोलावीत होती ती !

'हें पहा राजा! तूं माझा आजपासून पक्का दोस्त! आजपासून तूं माझ्याशिवाय कुठे खेळायचं नाहीस. कुठे जायचं नाहीस. तूं मला हवा आहेस. मी तुझ्यासाठी कांहीही करीन. मैत्री मात्र तोडायची नाही. घे. हा खिळा त्या झाडाला ठोक व शपथ वहा--'

माझ्याने शक्य होईल तेवढ्या उंचीवर मी तो खिळा अगदी पक्का ठोकला. बाजूला जवळच एक विहीर होती, त्यांत तिने तो दगड टाकून दिला—व नीट बुडाला किंवा नाही, याची खात्री करून घेण्याकरिता ती बराच वेळ विहिरींत डोकावत राहिली. असले दगड तरंगत असतील कां ?

'आणि राजा! आता तुला माझी गट्टी तोडतां यायची नाही. तुला आता माझं ऐकावं लागेल. तुला गडीफू करायची असेल, तर हा दगड काढून द्या व तो खिळा हातांनी उटपून द्या !' एखाद्या न्यायाधिशाप्रमाणे तिने मला निकाल सांगितला व त्याबद्दलची शिक्षाही सुनावली !

'हं, चल माझ्याबरोबर. जाऊं या आपण.'

मी निमूटपणें तिच्या मागून चालूं लागलों !

हा कसला विधि होता ? याला कोणत्या धर्मशास्त्राने संमति दिली होती ? तो कुणी शोधून काढला ? ज्या वेळीं धर्म नव्हता, बंधनें नव्हतीं, त्या वेळीं उभी मानव जात असलेच विधि करीत

आली असेल का ? अनंत कालापासून, युगयुगांतरीं मानव-जातीने आपलीं हृदयें याच—असल्याच विधींनी एक दुसऱ्याला अर्पण केलीं असतील का ? तसलें कांहीतरी अधिष्ठान त्याला असलेंच पाहिजे. एरवी त्यांत एवढें अद्‌भुत, अक्षय सामर्थ्य कसें येणें शक्य आहे ?

नंतर बरोबर दहा वर्षांनी विवाहाच्या विधींचे मंत्र भटजी म्हणत असतांना, तिने माझ्याकडे पाहून हसल्यासारखें केलें व पुनः एकदा तिने तो निकाल आपल्या टपोऱ्या डोळ्यांनी सुनावला.—तेव्हा, तेव्हाच ती मला सुंदर दिसली, तिच्यांतला विलोभनीय बदल मला त्याच वेळीं जाणवला व तिचें सारें व्यक्तित्व माझ्या डोळ्यांत भरलें !

मला अजूनही नेहमी भीति वाटते. असें वाटतें, मी कुठे गेलों, तिच्या मनाविरुद्ध माझ्या हातून कांही घडलें तर ? अजून देखील ती मला कदाचित् त्या विहिरींतील तो दगड काढायला लावील व तो खिळा उपटून आणायला सांगेल.

तिच्या कायद्याचें, निर्बंधाचें उल्लंघन करून समजा मी तो खिळा काढला तर ?

त्या निष्पाप पांखरांच्या साक्षीने एकमेकांना दिलेलें तें वचन निष्फळ होईल का ? तिचा कायदा नाहीसा होईल का ? हृदयाचे मोल देऊन तिने माझ्यावर जारी केलेल्या तिच्या त्या निर्बंधाचे बंध कधीतरी ढिले होतील का ?

## यौवन

हें कमलचें वेड ! स्वतःचें असेल नसेल तें सर्वस्व दुसऱ्याच्या स्वाधीन करून, त्या मंगल ठेवीची राखणदारी करीत फुलवातीच्या स्निग्ध प्रकाशांत तृप्त डोळ्यांनी—त्या नेत्रज्योतींनी आपल्या प्रियकराला ओवाळीत बसण्याचें हें तिचें हवेंहवेसें वाटणारें वेड—हेंच वेड मला लागलें—हेंच वेड अवघ्या जगाला लागलें तर ?

या प्रश्नाचें उत्तर देण्याचें सामर्थ्य फक्त कमलमध्येच आहे !

३-९-३९

—१६—

# अबोध बोध

" खरंच, अजूनहि तुम्हांला वेळ नाही का झाला माझ्याकडे पाह्यला ! "

विभाच्या या वाक्याने मी एकदम भानावर आलों. तिचा आर्तध्वनि, तिची उत्सुक आणि करुण दृष्टि, माझ्या डोळ्यांसमोर दिसूं लागली. माझेंच मला वाटलें, मी अपराधी आहें.

स्टेशनवरून उतरल्यापासून जवळजवळ एक तास झाला. माझ्या आईशीं, माझ्या शांताशीं मी हवें तेवढें बोललों. तिनेच बिचारीने काय पाप केलें होतें ?

वाटेल तेवढीं जरूरीचीं पत्रें असलीं, तरी आता लिहिणें बंद, अशा निश्चयानेच मी पेन खाली ठेवलें आणि नोटपेपर बाजूला सारले. तिच्या श्वसनाचा ध्वनि माझ्या कानीं पडला. तिच्याकडे पाहण्याची मला भीति वाटली.

" किती अंत पाहणार आहांत तुम्ही ? असे निर्दय कां झालांत ?—आज वीस दिवस झालेत बाहेर गेल्याला आणि आज येऊन सुद्धा— "

ती पुढे बोलली नाही– काय वाटेल ती शिक्षा तिने दिली असती, तरीदेखील ती भोगायला मी तयार होतों. तिच्या म्हणण्यांतलें अक्षरन् अक्षर खरें होतें.

पण मी बोलणार काय ?

ती माझ्या खुर्चीमागे येऊन उभी राहिली. तिने हळूच दिवा बारीक केला. माझ्या केसांचा सुगंध घेतला.

तरी देखील मला बोलवेना.

" मी जवळ येऊं का तुमच्या ? "

पंधरा दिवसांनंतरच्या माझ्या स्पर्शाने तिच्या सर्वांगावर रोमांच उठले. चंदनाला विळखा घातलेल्या नागिणीसारखी ती पूर्णपणें माझ्या आटोक्यांत आली. तिचे मंद निःश्वास माझ्या छातीला बिलगले.

अजूनहि तिला डोळे उघडण्याची आवश्यकता वाटली नाही. तिची अपेक्षा मला परिचित होती. पापण्यावरचे ओले केस पाकळ्यांनी पुसले गेले. पाखरासारखी नाजूक हालचाल झाली. तिच्या ओठांतून तेज छिटकलें.

" झालेत ना बारा खून माफ ? "

" इश्श — "

तिचा तो परवलीचा शब्द होता. समोरच्या खुर्चीवर ती बसली.

" एक माणूस किती सुखांत होतं पंधरा दिवस–त्रास नाही,

ससेमिरा नाहीं— "

" होतं खरं बेटं— "

" मुंबईला काय पाहिलं, हेंसुद्धा सांगायला तयार नाहीं कांहीं— "

" सगळं कांहीं पाहिलं. नागिणीचा विळखा पायाला नव्हता. वाटेल तिथे फिरलों. "

तिने माझ्याकडे संतापाने पाहिलें; पण खरंच, ते ईषदुन्मीलित नेत्र कधीतरी मला आपली दाहकता कळूं देतील का? तिच्या डोळयांतल्या भावांकडे पाहून मला अध्यात्मरामायणांतल्या दृष्टान्ताची आठवण झाली— " क्षीरमध्यगतं सर्पी यथा व्याप्याखिलं पयः—"

मी स्तब्ध राहिलों!

" आहे बुव्वा! " तोंडाचा चंबू.

मला आलेला संताप मी वेगळया रीतीने चापून घेतला.

तिने डोळे वटारले.

आगगाडी पुनः रुळावर आली.

" माझी निर्मला भेटली का? "

तिची मैत्रीण निर्मला! होय, तिला मी पाहिले होतें. अगदी एकाग्रतेने दृष्टीचा वेध लावून समुद्राच्या लाटांकडे पाहतांना मी तिला डोळयांत साठविली होती. लावण्यसागराची लहरी, असें मी तिचें वर्णन करून गेलों होतों. वाऱ्याने

कपाळावर भुरभुरणाऱ्या केसाच्या बटीने मला तिच्याकडे सारखें बघावेसें वाटलें होतें.

पण या सर्व गोष्टी सांगावयाच्या कोणत्या शब्दांत? समयोचित शब्द मला हवे होते.

"तुझी निर्मला? हो ती दिसली होती मला ओझरती. फोटोवरून मला तुझं म्हणणं खरं वाटलं नाही; पण खरंच ती अतिशय सुंदर आहे. तिच्या सौंदर्याला तुलना नाही—दोन मुलांची आई झाली तरीदेखील– ! "

मी हें म्हणून गेल्यानंतर तिच्याकडे पाहिलें. तिला आनंद झालेला दिसला. माझा जीव खाली पडला.

" तिला मी तीनचार वर्षांत भेटलें नाहीं. वाटतंय मला फार— "

' मग बोलाव की तिला इथं चार दिवस. मला जायचंच असतं नेहमी. पोचवून देईन. मलाहि बरं वाटेल. '

परंतु हें म्हणतांना माझ्या भावना एकेरीच होत्या का?

तिला आश्चर्य वाटलेंसें दिसलें. आज मी इतकी उत्सुकता दाखविली तिच्या मैत्रिणीबद्दल.

" माझी निमा आहेच छान! उद्या लिहितें मी तिला पत्र! "

[ २ ]

निर्मलेला टांग्यांतून उतरतांना मी नीट पाहून घेतलें. ती वर आली व मेहुणा या नात्याने जेव्हा तिने मला विनयाने

नमस्कार केला, त्या वेळीं तिच्या बोटांचा स्पर्श माझ्या पायांना झाला. ती उभी राहिली, त्या क्षणीं तिचीमाझी दृष्टादृष्ट झाली. ती हसली, तेव्हा मला चांदण्या सांडल्याचा भास झाला.

" कसं काय, प्रकृति चांगली आहे ना ? "

" होय ! "

पण त्या उद्गारांत मला स्वर्लोकींच्या साऱ्या मधुर लकेरी भासमान झाल्या. माणसाच्या अंतःकरणांत उपजतच काव्य असतें की काय कुणास ठाऊक !

ती परत खाली जायला लागली. तेव्हा पुनः एकदा माझ्या नजरेने मला फसविलें.

आणि माझ्या पत्नीची माझ्याकडे नजर जातांच मी असें नक्की ठरवून टाकलें की, आता म्हणून निर्मलेकडे पहावयाचें नाही. सौंदर्याच्या ठिकाणीं अनासक्तीच असूं शकते, असें नाही– माझ्या मनाने मला दटाविलें. किती किती कटु वाटलें मला तें वाक्य !

दुसरा दिवस उजाडला. सकाळीं विभा माझ्याजवळून उठून खाली गेली. मी त्या गोड सुस्तींत बिछान्यावरच पडून होतों. मन जागें झालें होतें. अगदी एखाद्या बालकासारखें ताजें तवानें ! त्याने आपलीं खेळणीं काढलीं. त्यांत त्याला नाविन्य दिसलें.

" चहाला चलायचं नाही ? "

" अं हं, मी इथेच घेईन चहा. "

त्रिभा माझ्याकडे क्षणभर पहात राहिली आणि ' बरें ' म्हणून निघून गेली.

" हें पहा- " मी विभाला हाक मारली.

" खालीच येतों मी चहा घ्यायला- " विभा परतली.

हें तरी वाक्य मी कां म्हटलें ?

आणि म्हटलें म्हणून काय झालें ? निर्मला सुंदर आहे. तिच्याकडे मला पहावेंसें वाटतें. मी बेजबाबदार नाहीं. निर्मला पण नाही. मला माझें मन ताब्यांत ठेवतां येतें.

आणि इतकें कळत असतांना मी माझ्या साध्यासुध्या इच्छा का दाबाव्यात ? माझे मन जास्त बंड करील अशाने ! झोपेला आसावलेला विद्यार्थी रात्रीं निजतांना पहाटेचा अभ्यास पदरीं पडावा, म्हणून घड्याळाला गजर लावतो आणि दुसरे दिवशीं अलार्म होतांच त्याचें निद्रालोलुप मन हजार सबबी पुढे करून त्याला झोपावयास लावितें.

त्याच अवस्थेंत मी खाली आलों.

निर्मला आणि विभा पाटावर बसल्या होत्या. तिसऱ्या पाटावर मी जाऊन बसलों. कांही कारण नसतां विभाला मी माझें स्वेटर आणायला वर पाठविलें.

" हा चहा तुम्ही केला का ? "

" होय— " निर्मलेचें उत्तर. नजर खाली.

" फार छान झाला चहा! "

" मग उद्यापासून मचि करीत जाईन की, त्यांत काय आहे?"

माझें अंतःकरण फुललें !

" स्वार्थी अहांत फार. मुंबईच्या मुशाफराला बोलाविलं पण नाहीं घरीं चहाला."

" इश्श ! तुमचा पत्ता तरी होता का आम्हांला ? पण आता मिळाला ना ? माझ्या विभाचं घर आहे हें. तुमचं नाही."

निर्मलेचा " इश्श ! " असा उद्गार आणि विभाचें घर !

तेवढयांतल्या तेवढयांत फुलोर मोहरला आणि लागलीच गळून पडला !

विभाचें घर !

पण मी निर्धार केला होता ना ? मग चहा पितांना बशींत अंतर राखून कोण निरखत होतं ? तथापि त्यांत काय मोठंसं ? पुनः हवं तर नाहीं करूं असं !

भीष्माचार्यांचें सहाय्य मागायला मन धावलें !

[ ३ ]

" निमाला किनई शकूनकळीचीं फुलं फार आवडतात. आणाल का ?— " विभा आंत येतांच म्हणाली.

" कुठून आणायची ? " पाध्यांच्या वाड्यांत फुलें आहेत, हें माहीत असूनही मी प्रश्न केला.

" इश्श ! माहीत नाहीं वाटतं ? "

काय बोलूं मी आता ? — “ बरं पाहीन ”

किती उदासीनता दाखविली मी ? मला माझ्याबद्दल विश्वास वाटला.

शकूनकळीचीं फुले !

अरे हो ! त्याबद्दल लिहून कळवायचं राहिलं आपल्या शेतवाल्याला ? एवीतेवी आणायचींच आहेत फुले !

पांचदहा मिनिटांत मी निघालों. सुवर्णमृगाने आणखी एक हुलकावणी दाखविली आणि रामाला सीतेपासून दूर दूर नेलें.

ती शकूनकळीचीं फुलें ! निर्मलेच्या आवडीत नि रूपांत किती साम्य होतें ! खरेंच मोठी रसिक पोरगी !

मोठी रसिक मुलगी !

रेशमाच्या रुमालांतून मी तिला तीं फुलं दिलीं. निर्मलेनें त्यांचा स्वीकार केला; पण मी कल्पिलें तेवढ्या औत्सुक्याने नाही, असें मला वाटलें. तिने काय करायला हवें होते ?

हें एक व त्याच दिवशीं तिच्या यजमानांचें खुशालीचें पत्र आलें होतें व मला त्यांत त्यांनी प्रेमपूर्वक नमस्कार लिहिला होता. हें दुसरें कारण–

आणि तें वाचतांच पुनः एकदा भीष्माचार्यांनी माझ्या मस्तकावर हात ठेविला.

*　　　*　　　*

“ निमाकरिता सुंदरसं लुगडं आणायचं आहे– ”

होय, हे उपचार पाळले पाहिजेत. माझें कर्तव्य होतें तें ! त्या वेळीं माझ्याजवळ होते तेवढे पैसे मी विभाच्या स्वाधीन केले. माझ्या पत्नीने निर्मलेच्या साऱ्या हौशी पुरविण्याचा हव्यास घेतला. मलाहि बरें वाटलें.

[ ४ ]

" आज आपण फिरायला जाल, तेव्हा आम्हांला पण हाक मारा. निर्मलेला घेईन मी–. "

" अंहं, आज फिरणं नाही होणार– " माझ्या निश्चयी मनाचें उत्तर.

" पण हें काय नेहमी ? इतका संकोच कसला ? ती ओळखीची नाही, कीं कुमारिका आहे ? "

पण आज वेळ कुठं आहे ? व्याख्यानाचं आमंत्रण स्वीकारलं आहे मी. "

" मग आपण एकाच मोटारींतून जाऊं. "

" पटवर्धन मला परस्पर घेऊन जातील. तुमच्याकरिता मोटार अवश्य पाठवीन. "

" विषय काय ? "

" प्रज्ञावाद "

" आ–हा– ! तुम्हांला काय वाटतं तुम्ही फार शहाणे अहांत ?–– " आणि उत्तराची अपेक्षा न करतांच ती पळाली अन् आपल्या मागे दार लावून घेतलें.

व्याख्यानांतून परत येतांनाहि मी एकटाच आलो.

तथापि निर्मलेचें माझ्या भाषणासंबंधीचें मत हवेंसें वाटलें मला. सर्व श्रोतृवृंदाने धन्यवाद देऊनहि असें कां वाटावें?

माझ्या मनाने या प्रश्नाचें उत्तर द्यायचें साफ नाकारले.

दिवस असे जात होते !

*     *     *

आता थोडेंसें माझी पत्नी विभा हिच्याविषयी !

विभा ? ती ना ? ती धुतलेल्या तांदळासारखी स्वच्छ आहे! माझ्या मनाने एकदम ग्वाही देऊन टाकली.

आजकाल ती माझ्या उद्गारांचा क्षणभर विचार करिते. ऊं ! असेल भांबावलेली थोडी मैत्रिणींच्या येण्याने ! नसेल सुचत थोडेंसें!

तिच्या पायावर डोकें ठेवावें मी ?

कुणी मला हा सल्ला दिला ?

माझ्या अधु आणि अपराधी मनाने ? कीं जबाबदार जाणिवेने ?

मी पुस्तक वाचूं लागलों !

*     *     *

नाही ! नाही ! निर्मला कसली सुंदर आहे ! तें तिचं भंगुर सौंदर्य नि अदीर्घ तारुण्य ! त्याचं काय वाटून घ्यायचं ? माझी विभा अन्तर्बाह्य सुंदर आहे. उद्या निर्मला विद्रूप झाली, तर मला कसलाहि ओलावा वाटणार नाही. काय फसवणूक चालविली

होती मी वेड्यासारखी ?

दोन तास विचार केल्यानंतर मी माझ्याशींच उपहासाने हसलों.

[ ५ ]

जिन्यावर दणदण पावलें वाजलीं.

कोण ?

ती विभा होती.

" निमाला किनई आज ताप आल्यासारखा वाटतो– " तिचा आवाज गुदमरला होता.

निर्मला ? आजारी ? त्या क्षणीं मी डॉक्टरकडे धावलों. निर्मला इन्फ्लुएन्झाने पंधरा दिवस बिछान्यावर पडणार होती. तिची मैत्रीण डोळ्यांत तेल घालून जागत होती. मलाहि झोप येईना. एकदोनदा असेंहि मनांत आलें– स्वतः जावें न् चौकशी करावी ! पण काय तें न कळें, मी गेलों मात्र नाहीं–मला तिच्याविषयीं काय वाटणार ? शिवाय, मध्यंतरीं तिचे यजमान येऊन तिला भेटून गेलेच आहेत की !

" निमा तुम्हांला बोलाविते–" विभाकरवी निरोप. आजाऱ्याचें मन दुखवूं नये. आज दहा दिवस ती फणफणते आहे तापाने.

एक शब्द न बोलतां मी पलंगाशेजारच्या खुर्चीत बसलों. माझ्या बोटाचीं नखें मी पहात होतों !

कां ? तीं जनावरांचीं होतीं की काय ?

" निर्मला, कशी झालीस ग तूं– " विभाला कळवळून आलें. " हिरवी गर्द वेल, पान नि पान गळून पडलं, – नुसता कोळपा झाला. "

माझ्या हृदयांत कसेंसेंच झाले !

" नाही विभा, मी बरी होईन नि खूप सुंदर दिसेन मग. तूं रडूं नकोस. "

कांही उद्देशाने म्हणून नव्हे, पण एक प्रकारच्या करुणार्द्र भावाने मी निर्मलेकडे पाहिले.

मी पाहिलें.

" अरेच्या, ही अजूनहि सुंदर आहे की ? "

पण माझा हा उद्गार कोठल्या सौंदर्यशास्त्राला धरून होता ? परंतु विचारशक्तीच गोठली माझी त्या उद्गाराने. माझ्या अंगाला दरदरून घाम सुटला. विभाकडे पाहण्याचेंहि धैर्य माझ्यांत उरलें नाही. गलितगात्र होऊन मी आवंढा गिळला.

आणि निमिषार्धात ताडकन् उठून मी माझ्या खोलीत आलों.

" विभा "—माझें मन चीत्कारलें. सहस्र नागांच्या खंबीरतेने आवरलेल्या बेजबाबदार मनाचा तो चीत्कार होता !

माझ्या पाठोपाठ विभा माझ्या खोलींत आली. मला डोकें दाबून बसलेला तिने पाहिला. माझ्या हृदयाचा आवेग तिला जाणवला.

माझे कढत निःश्वास सहन करण्याची शक्ति फक्त तिच्यांत होती.

" माझ्याकडे पाह्यचं होईल का ? "

अंतःकरणाच्या एकाहि चित्शक्तीने माझी कास बाळगली नाही.

" काय होतंय तुम्हांला ? मला सांगा ना ? "

मला संदेह उत्पन्न झाला, मी भानावर आहें कीं नाहीं याचा !

" मी तुमची ना ? सर्वस्वी तुमची ना ? "

अग्नीच्या साक्षीने तिने उच्चारलेलें तें वाक्य " ते नो अर्यमा देवः इतः प्रमुंचतु मा पतेः " पुनः एकदा मला ऐकूं आलें.

" तुम्ही माझे आहांत, मला सांगा तुम्ही तिथून एकदम कां उठून आलांत ? निर्मलेकडे तुम्ही पाहण्याचे कां टाळतां ? कां ? मनाला बांध कां घालतां ? "

माझें मनोबल, माझ्या चैतन्यशक्ति, माझे हृदयधर्म, साऱ्या-साऱ्यांचा लोप झाला होता ! तिने मला उठविलें, उभें केलें. माझ्या कपाळावर हात ठेवला. मला हस्तगत केलें. तिच्या भुज-लता माझ्या मानेभोवती पडल्या. तिचे डोळे थरथरत्या पापण्यांतून माझ्याकडे पाहूं लागले.

तिला माझ्या हृदयाची स्पंदनें ऐकूं आलीं कां ?

" सांगा, सांगा, मी ओळखलं ना ? ओळखलं ना सारं ?

पहा, माझ्या डोळ्यांत पहा तुमचं रूप पुनः... मी ”

एका अश्रूने पाप जळालें. मंत्राग्नि प्रज्वलित झाला.

“ नका, नका येवढा जिवाचा त्रास करूं ! मी तुमच्याकरिता काय वाटेल ते करीन— ” माझी अवस्था तिला पाहवली नाही.

ओठांच्या विलग झालेल्या पाकळ्या, आशंकेने अस्थिर झालेले डोळे, कढत ऊन ऊन निःश्वास—

आमच्या दोघांशिवाय सारें जग वितळून गेले !

पाखराने पिलाला पंखाखाली घातल्याचा प्रत्यय मला आला — अज्ञातांत प्रतिध्वनि उमटले— Children ! little children we are !

४-१-३७

—१७—

## चार आघात*

लग्न होऊन वर्ष झाले नाही, तोच तिला पहिलें मूल झाले, आणि नंतर वर्षाच्या आंत दुसरेदेखील.

आता मात्र तिची अशी प्रामाणिक इच्छा होती की, इतक्या लवकर आणि आणखी कांही वर्षे मूल होऊं नये.

यासाठी तिने पूर्वीच जे प्रयत्न केले, ते असफल झाले होते. तिने आता जो प्रयत्न करण्याचें ठरविलें, तो प्रयत्न आणि त्याकरिता तिची धडपड, या दोन्हीहि विस्मयजनक होत्या!

तिची प्रामाणिक इच्छा! किती साधी, किती सोपी, किती आटोक्यांतली ती इच्छा! जमिनीने म्हणावे मी काळी, कसदार राहीन, शेतकऱ्यांना मी कसलीहि आडकाठी करणार नाहीं आणि अंकुर वृक्ष मात्र मी उगवूं द्यायची नाही.

पण ही धरित्री शेतकऱ्याला प्रतिबंध करायला सज्ज झाली होती.

आणि म्हणून तिची ती इच्छा दिसली तितकी, भासली

---

* अविवाहितांना ही गोष्ट समजली नाही तर त्यांनी मला क्षमा करावी.

तेवढी सोपी आणि सहजपूर्त नव्हती; पण करणार काय ? ती समजदार होती, बरेंवाईट तिचे तिला कळत होते आणि हाच तर तिचा गुन्हा होता.

× × ×

त्याला पहिले मूल होतांच वाटलें, आता पुरें, इतक्यांत दुसरें नको.

दुसरें मूल झाल्यावर तो म्हणाला– " अरे, हें तर भलतेच झाले. "

पण हें भलतेंच झालें कां ? कुणाला खरें वाटेल का हें ?

मग तो " भलतेंच " असें कां म्हणाला ?

मानसशास्त्रज्ञ याचें उत्तर देतील—तिसरें मूल झाल्यावर तो तसेंच म्हणेल म्हणून !! भलत्या गोष्टीला " भलतेंच " म्हणून चालत नाही. जेवढें करणें शक्य असतें, तेवढ करूनहि पुष्कळांना अपयश येतें. जें होऊं नये, असे आपल्याला मनापासून वाटते, तेंच नेमकें होतें.

आणि असें झालें, म्हणजे संसारांतील मानसशास्त्राचा पहिला धडा सुरू होतो.

तिचें नांव कमला आणि त्याचें नांव विश्वास असें होतें. दोघेहि देवाब्राह्मणांसमक्ष शपथ घेऊन मोकळे झाले होते. दोघेहि प्रामाणिक होते. म्हणजे, मोठेपणाचा आव नव्हता आणि ढोंगाचें नांव नव्हतें.

व या असल्या सुविद्य, प्रमाणिक, समजदार जोडप्याच्या संसारांतच शहाण्या कमलने वरील गुन्हा केला होता.

हो, होय! गुन्हाच म्हणतों मी! तुम्ही दचकूं नका हा शब्द ऐकून! परिणाम जर एक असला आणि शब्द कोणतांहि वापरला, तर मग ‘ गुन्हा ’ या शब्दाशींच वैर कसलें? दृष्टी-मध्ये हरिणाचा भेदरटपणा सदाचा येऊन बसला. अंतःकरणांत फाजील सावधगिरी घर करून बसली आणि या दोन्ही गोष्टीं-मुळे आयुष्य कृत्रिम, लपवाछपवींचें, साचलेल्या पाण्यासारखें होत असलें, तर वर लिहिलेला शब्द वापरणें हा अपराध नाही. जीवनांत जर उपरोध असेल, तर त्याला ‘ संवादित्व ’ म्हणूनहि त्याचा परिणाम सौम्य व्हावयाचा नाही!

आता कमला व विश्वास यांची गोष्ट सुरू झाली!

तो ऑफिसमधून आला आणि उभा राहिला. ज्या गोष्टींची कमलला कधीं आवश्यकता भासली नाही, त्या गोष्टींची तिला आता गरज वाटूं लागली होती. आणि हें कधीपासून? तर ज्या दिवशीं ती इच्छा व तो निश्चय केला, त्या दिवसापासून!

कमल सामोरी गेली. तिने त्याचा कोट घेतला; जागचे जागीं ठेवला. टोपी खुंटीवर अडकविली, स्वतः चहा केला आणि स्वतःच आणून दिला. विश्वासच्या तोंडावर पसरलेलें अकारण औदासिन्य जेव्हा नाहीसें होत चाललें, तेव्हा तिला कोण आनंद झाला! स्वतः केलेल्या साखरपाऱ्याच्या वड्या

तिने त्याला खायला दिल्या. छोट्या, चिमण्या, बाळसेदार मुलाला मुद्दाम उठविलें आणि विश्वासला घ्यायला लाविले. विश्वासने त्याचे चुंबन घेतले. त्यास घट्ट धरिले आणि त्याच्याशीं असंबद्ध अशा प्रेमाच्या गोष्टी केल्या.

तें प्रेमळ पोर आनंदाने हसूं लागतांच त्या वत्सल मातेच्या हर्षाला, उल्हासाला सीमा राहिली नाही !

" किती गोड आहे आपला विलास ? " मातेचा हा उत्कटतेचा उद्गार विश्वासलाहि पटला, आवडला ! त्यानेहि मुलाकडे हसत हसत पाहिलें. तिच्याकडेहि पाहिलें व त्याच्या तोंडावरचे हास्य किंचित् कमी झाले. डोळे तेच असूनहि त्यांतील भाव बदलले, आणि ...

आणि जी सावधागिरी कमलच्या हृदयांत घर घेऊन राहिली होती, तिने स्वतःच्या अस्तित्वाचा पहिला ठोका, पहिला तडाखा कमलला दिला !

[ २ ]

विश्वासचा मित्र सहकुटुंब त्याच्याकडे आला होता. तो आला, अशा वेळीं की, सर्वांचीं जेवणे उरकून गेलीं होतीं; विश्वासच्या आईला पुनः चूल भरावी लागली. कमलला पुनः पाटपाणी करावें लागलें. अवेळीं थोडेसे कष्ट अंगावर जास्त पडल्यामुळे सासूला त्रासल्यासारखें झालें होतें.

आणि तिला यत्किंचित् देखील नाखूष करावयाचे नाही, असा

कमलने त्या – त्या दिवसापासून निश्चय करून टाकला होता !

" ताटं नीट पुसून ठेवलीस ना ? "

" होय ! "

" पाण्याचं भांडं कोणतं दिलंस !— तें विश्वासचं भांडं आहे ना ? "

" होय ! "

" मग ते पाहुण्यांना देतेस कशाला ? त्यांना चांदीचं भांडं काढून दे. "

पाहुण्यांना चांदीचीं भांडीं मिळाली. जेवणें संपली

" आता हें सारं आवरून टाक. थोडा वेळ स्वयंपाकघर पुजलं तर फारसं नुकसान नाही व्हायचं—"

हे बोल, जर सासू त्रासलेली नसती, तर तिने खचित उच्चारिले नसते आणि कमलने निश्चय केला नसता, तर तिला देखील ते जाणवले नसतें.

त्या मित्राची पत्नी कमलच्या मदतीला आली.

" नका हो ! येवढं काय काम आहे ! तुम्ही आता दमून आलांत ! "

" येवढ्याने काय आता जास्त थोडाच थकवा यायचा आहे ? तुम्हांला सोबत करतें; पण आई अशा रागवल्यातशा कां दिसतात हो आज ? "

" छे, हो ! मला तर नाही कुठं तसं भासलं ! आणि रागावल्या

असतील कधीमधी त्या देखील बऱ्याकरिताच ! ”

परंतु जें भासलें, तें विमलने लपविलें. विश्वासच्या डोळ्यांतलें तें औदासिन्य बदलावें, म्हणून तिने निश्चय केला. विश्वासची आई विश्वासला मनापासून हवी होती. मग आईच्या बाबतीत कमलने हा निश्चय केला, त्यांत बिघडलें कुठे ?

तथापि, सासूचें पाऊल स्वयंपाकघराच्याबाहेर पडतांच कमलच्या हृदयांतील नव्या घरवालीने दुसरा ठोका- दुसरा तडाका दिला आणि स्वतःचें अस्तित्व तिला जाणवून दिलें.

[ ३ ]

विलासच्या वेळेला जी डॉक्टरीण कमलला तपासून गेली, तिच्याशी आणि त्या कुटुंबाशी या एक वर्षात फार घरोबा वाढला होता. ती बाई दर रविवारीं हटकून विलासला पहायला म्हणून येत असे. फार आनंदी आणि मोठी मानभावी होती. चहाच्या टेबलावर त्या तिघांच्या तासन्-तास गप्पा चालत. आताहि संभाषणाला नुकतीच सुरुवात झाली होती. निरपराधी हवेला आणि उन्हाला या वेळींहि संभाषणाकरिता वेठीस धरण्यांत आलें होतें.

‘ किती उकडतंय आज ?—’ विश्वास, वारा घेत आणि डॉक्टरणीकडे पहात !

‘ आणि आता कुठे उन्हाळयाला सुरुवात- ’ डॉक्टरीण, घाम टिपत आणि कमलकडे पहात !

' आणि वारे पण किती गरम कसतात ? कालतर यांनाहि नीटशी झोप आली नसेल. '— कमलचा उद्गार, विश्वासकडे पहात !

' पण यांच्या झोप न येण्याचें कारण वेगळे असेल. '

असें म्हणून डॉक्टरणीने हसत हसत आणि मिस्किलपणें विश्वासकडे पाहिलें !

विश्वासने कमलकडे पाहिलें.

कमल दचकली.

आणि तिने तें लपविलें.

" छे ! छे ! भलतेंच कांही, तसें नव्हे. "

" पण मग तुम्हांला तर येवढी प्रशस्त गच्ची आहे की. "

" पण गच्ची असली म्हणून ? अहो, मला तर आंतच झोपावें लागते. यांना आताशा काम पडते फार; नि गच्चीवर पडले, म्हणजे साहजिकच त्यांना बरें वाटावें म्हणून मी आंत झोपतें. पुनः माझेजवळ विलास असतो व तो रात्रीं उठला तर रडतो; व मग यांची होते झोपमोड. शिवाय आताशा तर तो फारच रडायला लागला. काल सहज रात्रीं मी विलासला घेऊन बाहेर आलें, तों हे देखील पंख्याने वारा घेत होते. आतापासून इतका उकाडा आणि ही तर उन्हाळयाची सुरुवात "

तिघेहि चहा पिऊं लागले. उन्हाळ्याचा उष्मा आणि विलासचें रडणें हीं दोन कारणें जर सापडलीं नसतीं, तर

कमलला वरचें चऱ्हाट खचित लांबवितां आलें नसतें; पण तिला तीं कारणें सापडून गेलीं.

आणि तिनें तसें बोलून दिलें. शरीराची ती डॉक्टरीण चिकित्सेंत पडली नाहीं.

तथापि आपण तीं कारणें का सांगितलीं, हें कमलचें कमललाच उमजण्यापूर्वी तिच्या काळजांत तिसरा ठोका— आघात —तडाखा बसला !

[ ४ ]

कमलचा मामेभाऊ श्री त्रिंबकराव देशपांडे हा विलायतेहून येतांच पहिल्यांदा कमलकडे उतरला. त्याला कारणहि तसेंच होतें. विश्वास यापूर्वीच जाऊन आल्यामुळे त्याचा अनुभव त्रिंबकरावाला उपयोगी पडला होता व विश्वासशीं मन मोकळें बोलावयास म्हणून तो मुद्दाम आला होता.

जेवणें झाली आणि ही सारी मंडळी चांदण्यांत गप्पा मारूं लागली. त्रिंबकरावानें सिगारेट काढली व तिचा एक झुरका मारला.

‘ त्रिंबक, पछाडलेलं दिसतंय या बयेनं तुला—’

‘ छे, नेहमी नाहीं मी पीत ! उगीच अवचट Company's Sake ( मैफलींत उगीच ) ’

‘ म्हणजे, माझ्यासारखंच तुझं ’

‘ पण मी म्हणतें, हीं व्यसनं अशीं लाडविलीं, तर सदाची

जडतात: तर त्यापासून मुळांतच सावध राहिलेलं बरं नाही कां ? '

' तथापि, हे प्रत्येकाच्या मनावर आहे. मी दिसलों का कधी तुला कमल नियमित ओढतांना ? पण मी Companys Sake तर घेतोच. '

' तुमची गोष्ट एक वेगळी— ! तुमचा तेवढाच मी अपवाद पाहिलेला आहे. यांची गोष्ट किनई, त्रिंबकराव, अगदी मुलखा-वेगळी बरं का ? यांचं मन विलक्षण ताब्यांत आहे. कोणत्याही इच्छेचा पगडा ते आपल्या मनावर सहसा बसूं देत नाहीत. '

' विलक्षण ' हा शब्द उच्चारतांना कमलने मोठा जोर दिला. हें वाक्य उच्चारून होतांच तिने विश्वासकडे पाहिलें आणि त्याच्या डोळयांत ते—ते—औदासिन्याचे भाव आहेत की काय, याची खात्री करून घेतली ...

पण पहात असतांनाच त्या तिच्या हृदयांतील घरवालीने तिच्यावर चवथा आघात केला !

[ ५ ]

आता मला सांगा कमलची इच्छा प्रामाणिक होती किंवा नाही ? आणि याचेंहि उत्तर द्या की, त्यांच्या जीवन-प्रवाहाचे पाणी साचलें होतें किंवा नाही ?

ज्या वेळीं झाडांना पालवी फुटावी, झऱ्यांना खळखळ सुटावी, उषेला लाली चढावी आणि संध्येला अनुराग यावा, ज्या वेळी

# यौवन

शुद्ध, मादक, नैसर्गिक जीवनरसाने हृदयपुष्पें फुलून यावीत, त्या वेळीं कमलच्या हृदयांत ठोके पडत होते—आघात होत होते ! —आणि ते होत नाहीत, फुलें फुलतात, झरे वाहतात, पालवी फुटते, हें ती दाखवीत होती.

आणि तें जगाला दिसत होतें !

अजून कमलने आपली प्रामाणिक इच्छा सोडून दिली असें ऐकिवांत नाही.

जीवनाच्या कोणत्या मैदानात आणि कोणत्या आघाडीवर आपल्याला झुंज खेळावी लागेल व आघात सोसावे लागतील, हे कधीतरी कुणी नक्की सांगेल काय ?

१७-९-३८

—१८—

# परवाचीं दोन स्वप्नें

जी गोष्ट मी जन्मांत कधी केली नव्हती, ती त्या दिवशी केली. घरीं आलों. कपडे काढले व घर बांधल्यापासून ज्या खुंट्या धूळ खात पडल्या होत्या, त्या खुंट्यांवर मी ते व्यवस्थित ठेवले. आंतलें बनियन घामानें चिंब झालें होतें, तें लगेच नोकराला बोलावून धुवायला दिलें. स्वतःचे केस नीट करून टेबलावरील पुस्तकेंहि रचून ठेवलीं. खोली स्वच्छ करविली. एक पुस्तक उचललें आणि विशिष्ट लकब आणून खुर्चीवर वाचत बसलो.

तथापि, जो मी पुस्तक हातीं पडतांच एकाग्रतेने भराभर पानें वाचून जायचा, त्या मला त्या दिवशी एकाहि पृष्ठावर काय लिहिलें आहे, हें उमगेना !

माझी खोली स्वच्छ कां झाली, याचे माझ्या धर्मपत्नीपेक्षाही मलाच जास्त आश्चर्य वाटलें. कधी नाही ते आज झालें आणि हे झालें तरीं कसें ?

मोपॉसाँ या वेळेला जन्माला आला असता व त्याने आजचा

प्रकार पाहिला असता, तर तो मात्र माझ्या आजच्या वागण्याचे कारण खचित सांगता; कारण दुसऱ्या कोणत्याही लेखकापेक्षा जास्त खरें लिहिण्याची त्याची प्रवृत्ति होती !

आणलेला चहा पिऊन मी स्वतःच कप नीट पोचवून दिला.

आणि त्यानंतर नेहमीच माझ्या सर्व गोष्टी जिथल्या तिथेच व जशाच्या तशाच स्वच्छ आणि नीटनेटक्या राहूं लागल्या ...

पण हें विधान माझ्या हृदयाच्या बाबतींतही लागू पडले असते कां ? देव जाणें !

ज्या गोष्टीची मी रोज चौकशी करीत असे, त्या गोष्टींची मला विचारणा करावीशी वाटेना; आणि ज्या विचारूं नयेत, दाखवूं नयेत, दिसूं नयेत, त्या गोष्टी मात्र तीनतीनदा मनांत येत.

आणि हेच त्यांत विशेष होतें !

कुणाला जी भर्जी आवडलीं, ती मला आवडूं लागली. कुणाला एखादा रंग आवडल्याचें ओझरतें जरी दिसून आलें, तरी त्या रंगाचे मी कपडे शिवूं लागलों.

माझ्या असल्या या जपणीच्या व चांगल्या वागण्यामुळे सर्वांना मी हवासा वाटलो; माझ्या आईला, भावंडांना मुलांना, पत्नीला – झाडून साऱ्यांना !

सूर्य उगवतो. त्याच्या प्रकाशाने सारें जग हसतें. तो कुणासाठी उगवतो कुणास ठाऊक ! व मी देखील असा कुणासाठी

वागत होतों, हे ... हें !

× × ×

पहिल्यांदा — अगदी पहिलीवहिली अनु जेव्हा आमच्याकडे आली, तेव्हा तिचा तो अवतार पाहण्यासारखा होता. आमच्या शेजारीं ती आल्यापासून तिच्याबद्दलची चर्चा हा आमच्या इथला एकमेव विनोदाचा विषय होता. कितीहि कुणी म्हटलें, तरी ती तशीच वागायची ! जणु काय तिचा तो हव्यास होता व कॉलेजांतल्या मुली देखील तिच्या खिसगणतींत नव्हत्या. एकदा मी सहज तिला म्हणालों– " अनुताई ! तुम्ही थोड्या व्यवस्थित राहिलांत, गळत्या पेनने पडलेले डाग धुवून काढलेत व पातळांना रस्ते झाडण्याची बंदी केली, तर तुम्ही कितीतरी सुंदर दिसाल ! "

दुसरे दिवशीं ती आमच्याकडे आली असतांना वरील गोष्टींपैकी एकहि तिच्यांत आढळली नाही !

मला नुसतें आश्चर्यच वाटलें नाही. बरें वाटलें ! अभिमान वाटला आणि हीच गोष्ट माझ्या ध्यानीं राहून गेली !

परवा जेवायला बसलों. स्वयंपाकघरांत हास्याचे फवारे उडूं लागले. अनुताईच्या गप्पा मी यायच्या अगोदरपासूनच सुरू होत्या.

जेवणाच्या बाबतींत मला ज्या सवयी आहेत, त्या पाहिल्या

म्हणजे मला कधी कधी वाटतें की, मोरांच्या जिभांची भाजी खाणारा ' नीरो ' आणि मी कोणत्या ना कोणत्या जन्मीं वंशज खात्रीने होतों. फणसाची भाजी एखाद्या आधाशासारखी मी खाऊन टाकीत असे व आज देखील अर्थात् ती पानांत दिसतांच मी गोष्टींच्या भरांतहि तिच्याकडे दुर्लक्ष्य कधीच केलें नाही.

' भाजी ' मी पुकारा केला.

' आता आमच्याकरिता थोडी असूं द्या की चवेला– ' माझ्या सुशील पत्नीचा मला निःस्वार्थी सल्ला !

' म्हणजे ? स्वतः करूनही तुझी तृप्ति झाली नाही ? आणि केली तर इतकी थोडी ? असें कां ? '

' आज घरांत मुळीं भाजीच झाली नाही. ही अनुताईने आणली हो ! व ती देखील तिने मुद्दाम स्वतः केली. परवा त्या सहज विचारीत होत्या— तुम्हांला काय आवडतें म्हणून. मी त्यांना भाजीचें सांगितलें आणि त्यांनी करून पण आणलीन् ! फसलांत पुरे ! "

' असं कां ?— ' परंतु असा उद्गार काढतांना मला ती भाजी चांगली झाली आहे, असें म्हणण्याचेंही भान राहिलें नाही. किंचित्काल मी स्तब्ध बसलों.

मला नुसताच विस्मय वाटला नाही. फार बरें वाटलें आणि अभिमान पण तितकाच !

× × ×

## परवाचीं दोन स्वप्नें

वरेरकर मला भेटले, त्या वेळीं त्यांनी स्वतःच्या ' सवंगडी ' ची फार तारीफ केली होती आणि आगगाडीत बसतां-बसतांहि पुनः त्यांनी मला बजावलें होतें, ' तो खेळ जरूर पहा—'

सुदैवाने तो खेळ आमच्या गावीं लागला. पहिले दिवशीं तो मी एकट्याने पहावा आणि बरा वाटल्यास दुसरे दिवशी साऱ्यांना पाठवावें, असा व्यावहारिक विचार मी केला. माझ्यासारखीं मध्यम स्थितींतील माणसें असाच विचार करितात व त्या विचाराचा उत्तरार्ध आठवणीने विसरून जातात.

खेळ संपला. साडे दहा वाजले होते. घरीं आलों. दार बंद होतें. जाळींतील तिन्ही बिऱ्हाडे अगदी शुक्क होतीं. बरेच दिवसांनी आपल्याला स्वस्थ झोप मिळेल, असा समंजस विचार आमच्या सुशील पत्नीच्या मनांत येऊन त्यांनी स्वर्गापर्यंतची मजल गाठली होती. एक, दोन, तीन, दहा हाका मारल्या तरी त्या स्वर्गापर्यंत थोडीच ऐकूं जाणार ! शेवटी एक निकराचा प्रयत्न केला — येवढ्यांत.

' थांबा अं ! मी आत्ता उठवितें वहिनींना ' असे मृदु बोल ऐकूं आले. त्यांत कांहीही नव्हतें; पण मला ते आवडले.

थोड्याच वेळांत दार उघडलें गेलें.

' अखेर जागी झालीस कशी ? '

' अनुताईनी माजघराचें दार ठोठावून हाका मारल्या.

म्हणाल्या आपण कितीतरी वेळापासून उभे आहांत !'

' काय ? काय म्हणाली -- म्हणाल्या त्या ? '

' कांही नाही, तुम्ही हाक मारून थकलांत असें-'

मला वाटलें पुनः एकदा विचारावे ' काय ? काय म्हणाली ती ?

पण विचारले मात्र नाही.

आणि विचारणेंही बरें नव्हतें !

या वेळीं मला विस्मय मात्र वाटला नाही. फार फार बरें वाटलें ! खूप अभिमान वाटला !

त्या रात्री मी गाढ झोपलों. सुखाने मला हायसें वाटलें. मला मधुर सुखस्वप्नें पडलीं. त्यांत मला दिसत होतें- मला सारे मान देत आहेत.- चांगले म्हणत आहेत-माझ्या बोलण्याची, माझ्या कृतीची सर्वजण वाखाणणी करीत आहेत !

असें स्वप्न कुणाला नकोसें होतें ?

सकाळीं जागा झालों आणि स्वप्नाची आठवण केली. 'सत्यसृष्टींतील माझ्या परिस्थितींत आणि स्वप्नाच्या जगांत काडीइतकाहि फरक नव्हता.

× × ×

मला कामावर जाणें शक्य नव्हतें. कांही दिवसांपूर्वी पत्नीला आलेल्या तापाने पलट खाल्ली व तो तिच्या चांगलाच खनपटीं बसला. माझ्याशिवाय तिला कोण होतें ?

अगदी कुणीकुणी नव्हतें !

आणि मला ?

छे, छे!

मी तिच्या खाटेवर बसलों होतों. थोडा वेळ झाला अनु बसून गेली होती. हाताने हलकें हलकें मी तिला कपाळावर थोपटीत होतों. तिला माझा हस्तस्पर्श हवासा वाटत होता— तिने तें स्पष्ट म्हणून दाखविलंहि होतें !

‘ या ना ! आणखी जरा जवळ या ना — ’

‘ तूं आता स्वस्थ झोप बरं. ’

‘ अहं, मला अशानेच बरं वाटेल. बसा ना ! ’

मला तिचा शब्द मोडवेना आणि इतके दिवसाचे जिवाचे लागेबांधे ! मी जवळ गेलों. मला अधिकच मोह, अधिकच आकर्षण वाटलें तिच्याविषयी.

पति म्हणून तिला मी सर्वस्व होतों. मला देखील तिच्या-परता...

पण याच्यापुढे लिहायला ही माझी लेखणी अडखळते का ?

‘ तुम्ही किती चांगले आहांत. तुम्हांला कल्पना येणार नाही, इतकं तुमच्याविषयी लोक आताशा चांगलं बोलतात. मला किती बरं वाटतं. तुम्ही असे, एकदम निर्दोष कसे झालांत ? कुणी जादू केली तुमच्यावर ?

ती मला आणखी जवळ ओढूं लागली—आणखी जवळ !

कुणाहि प्रामाणिक माणसाला आपल्या प्राणप्रिय पत्नीचे हे उद्गार जीवनप्रद वाटतील. जिला आपण मनोभावानं सुशील म्हणतों—तसे म्हणतांना आपल्याला अभिमान वाटतो, त्या पत्नीचे हे उद्गार !

मला कृतकृत्य वाटलें ! पण आश्चर्य वाटले नाही. अभिमानहि वाटला नाही—तसा अभिमान जसा... !

पण हे काय ? हे डोळे कां भरून येतात ? ही गळती कां लागली आहे ? मला बुजल्यासारखें कां वाटतें ? हृदय असे भरून कां आलें ? हा हुंदका मी कसा आवरूं ? हें काय, हे काय ?—

त्या रात्री मी झोपलो. मला कुणीतरी सांगत होतें. माझें मनच असेल बहुधा—तें वारंवार सारी रात्र मला सांगत होते, थांब ! इथेच थांब आता. तुला ओलावा देणाऱ्या झरीचा आता यापुढे शोध लावूं नकोस. आणखी एक पाऊलहि पुढे टाकूं नकोस !

‘ कमलें अशींच फुलतात. फुलें अशींच टवटवतात. चातक असाच तृप्त होतो. चकोर अशीच वाट पहातो. आता पुरें ! ’

मी जागा झालों. सकाळीं पाखरासारखी झोप उघडली, डोळे ओले होते. अगदी दवासारखे ! आणि माझें स्वागत कुणी केलें ?

## परवाचीं दोन स्वप्नें

जिचें तोंड आजाराने मलूल झालें आहे आणि तरी देखील जें जीवनाच्या भरदार आनंदाने कदंब वृक्षाच्या उमलत्या कळीसारखें फुललेलें आहे, अशा माझ्या परमप्रिय पत्नीने !

अनुताई शेजारच्या माडींत आपल्या छोट्या भावाला शिकवीत होती—Where ignorance is bliss it is folly to be wise !

१७-९-३८

—१९—

# तीन पानें

तिचे मऊ, नाजुक आणि मांसल हात फुलांपेक्षाही सतेज आणि हवेसे वाटत मला ! मी तिच्या हातीं पेन दिलें. — ‘ सुधा, तुला हवें तें एक वाक्य यावर लिहून खाली सही कर ’

तिला मौज वाटली. किंचित् थांबून तिने लिहिलें. ‘ माझ्या जीविताचे लागेबांधे तुमच्याशींच गुंतले आहेत. ’ तिचा त्या वेळचा एकमात्र विलास तोच. हातावर ठेवलेली संत्र्याची पाकळी पोपटाने अलगद उचलावी; त्याचा मृदु स्पर्श आपल्याला चिरवांछित वाटावा—

सुधेने माझ्या हृदयांतून टिपलेल्या भावना !

*   *   *

तिच्या डोळ्यांतून फुलवातीची ज्योत तेवत होती.

सुखाचे रांजण जीवनरसाने ओसंडत होते. मी हळूच तिला म्हणालों– " सुधा, आजही इथे एक वाक्य लिहून सही कर पाहूं ! " क्षणाचाही विचार न करतां ती लिहून गेली– " माझी कुंदाराणी, माझीच ती. "

कुणीतरी माझ्या हृदयांतली फुलें वेचून घेतलीं व कुणालातरी वाहून टाकलीं, जिथे त्यांचा सुगंध, त्यांतला मध हवा होता.

त्यागाच्या पुण्यमय जाणिवेने डवरलेलें तिचें मुखमंडल ! कुंदाच्या सुखासाठी गोळा केलेली मधुगंधी फुलें– भरलेली ओंजळ !

*                *

गवताचा रंग बदलला होता. पानें हलकीं झालीं व गळूं लागलीं. सुधेचे केस उगीचच वाऱ्यावर उडत. कुंदा नाही, मी नाहीं. एकटी सुधा बसलेली. हृदयांतले जीवनरसाचे झरे ! ओंजळीओंजळीने कुणीतरी त्यांतलें पाणी पिऊन टाकलें होतें.

" सुधा ! आयुष्याचें तिसरें पान. आता सही कर ना ! "

## यौवन

तिचा तो श्रमांनी जर्जर झालेला हात थरथरा कापला. अक्षरें जागोजागीं वेडींवाकडीं झालीं. भीत भीत तिने लिहिलें– “ माझ्यापासून कुणी, कुठे कुठे जाऊं नका. ”

ती त्या वाक्यांकडे पहात राहिली. मिठाचे थेंब त्यावर पटापटा पडले. आता कुठलें दिसायला तें वाक्य! केळीचें नाजुक झाड मुळापासून हादरलें व तिने माझा आधार घेतला. घरट्यांतून खालीं पडलेल्या पिलाप्रमाणें भेदरलेली तिची नजर! तिच्या काळजाचें झालेलें पाणी–

एके काळच्या चंद्राच्या उपमा– फुलांचें साम्य !!

शरद्-पूर्णिमा

ता० २७.१०.३९.